# पिसारा

डॉ. अनंत वामन वर्टी.

सन १९४९

-: एकमेव विक्रेते :-

जोशी ब्रदर्स, बुकसेलर्स
६७८, सदाशिव, पुणें २

एखाद्या लघुकथासंग्रहाला किंवा लघुनिबंधसंग्रहाला नांव काय द्यावें, हा लेखकापुढें मोठाच प्रश्न असतो. ह्या अडचणीवर मीं गमतीनें लिहिलेला 'पुस्तकाचें आडनांव' हा लघुनिबंध ह्याच संग्रहांत समाविष्ट केलेला आहे. ह्या संग्रहास मीं 'पिसारा' हें नांव दिलें, त्यावेळीं माझी कल्पना होती कीं हें नांव नवीन आहे. परन्तु नंतर मला कळून आलें कीं एका दिवंगत लेखकानें आपल्या लघुनिबंधसंग्रहाला हें नांव पूर्वीच देऊन ठेवलें आहे. 'पुस्तकाचें आडनांव' हा लघुनिबंध लिहितांना, त्यांतील प्रसंग माझ्यावरच येईल, अशी मला कल्पना नव्हती.

सगळी छपाई झाल्यानंतर ही गोष्ट मला समजून आल्यामुळें नांवांत आतां बदल करणेंहि शक्य नाहीं. पाहिजे असल्यास, 'पुस्तकाचें आडनांव' ह्या लघुनिबंधांत सुचविलेल्या युक्तीचा उपयोग करून ह्या संग्रहाला आपण 'पिसारा अनंत वर्टी' असें म्हणावें म्हणजे झालें. !

— अ. वा. वर्टी

# पुस्तकाचें आडनांव : : १

माझ्या लघुकथांचा एक संग्रह प्रकाशित व्हायचा आहे. संग्रह प्रकाशित करण्यास प्रकाशक तयार आहेत. त्यांच्या गुदामांत कागदहि भरपूर आहेत. माझ्या लघुकथा संग्रह-रूपांत पाहून घेऊन माझ्या डोळ्यांचं पारणं फेडण्यास मीहि उतावीळ झालेलों असल्यामुळं मोबदल्याचा प्रश्नहि प्रकाशकांना फायदेशीर रीत्या पण चटकन् सुटलेला आहे. संग्रहाच्या प्रकाशनाचीं बोलणीं निघण्यापूर्वीच कितीतरी दिवसांपासून—खरं म्हटलं म्हणजे अगदीं पहिली गोष्ट मी लिहावयास घेतली तेव्हांपासूनच—संग्रहाकरितां एक काव्यपूर्ण नि आकर्षक नांव मी शोधून ठेवलं होतं. मला वाटत होतं, आतां संग्रहाचं प्रकाशन अगदीं सुरळीतपणानं पार पडेल !

प्रकाशनाची प्रास्ताविक तयारी झाल्यावर प्रकाशकांनीं मला विचारलं, " संग्रहाचं नांव काय ठेवणार तुमच्या ? "

" संग्रहाचं नांव ? " मी आत्मविश्वासानं उत्तरलों,

"संग्रहाचं नांवदेखील तयार आहे कीं. माझ्या लघुकथा-संग्रहाचं नांव ठेवायचं 'प्रतिमा!' नांव छान अर्थपूर्ण आहे नाहीं?"

"हं. आहे खरं तसं. पण...पण आपणाला नाहीं त्याचा उपयोग व्हायचा. पूर्वीच कुणीतरी आपल्या एका पुस्तकाला हेंच नांव देऊन ठेवलं आहे. पूर्वी एखाद्या पुस्तकाला दिलेलं नांव परत आपल्या पुस्तकाला कसं देतां येईल? दुसरं एखादं आकर्षक नांव शोधून काढा." प्रकाशक म्हणाले.

इतके दिवस मीं ठरवून ठेवलेलं नांव आधींच कुणीतरी आपल्या संग्रहाला देऊन ठेवलं आहे हें समजल्यावरहि दुसरं एखादं चांगलंसं नांव शोधून काढण्याविषयीं मी कांहीं निरुत्साह झालों नाहीं. म्हटलं, त्यांत काय आहे? अशीं एक नाहीं छप्पन नांवं थोड्याच वेळांत मी माझ्या संग्रहाकरितां शोधून काढीन! "उद्या नांव सांगतों," असं प्रकाशकांना सांगून मी निघून आलों.

संध्याकाळीं मी नगरपालिकेच्या उद्यानांत फिरावयास गेलों. उद्देश इतकाच कीं तिथल्या एखाद्या सुंदर फुलाचं, रसाळ फळाचं किंवा एखाद्या वृक्षवेलीचं नांव आपल्या संग्रहाला देतां आलं तर पाहावं. तिथं हिंडतांना सर्व वृक्ष, वेली, फुलं नि फळं यांची मीं एक यादी केली आणि त्यांच्यापुढं गुच्छ, करंडक, ओंजळ किंवा ताटवे ह्यांतील योग्य शब्द ठेवून ते कसे दिसतात हें पाहूं लागलों. आणि जसजसा हा प्रयोग मी करून पाहूं लागलों तसतसं हें काम सकृद्दर्शनीं दिसलं तेवढं सोपं नाहीं, हें मला कळून आलं. कांहीं फळांफुलांच्या नांवांची व

ह्या शब्दांची दोस्ती जमेना किंवा जमलीच तर ती कानांना गोड लागेना. आणि कांहीं समास कानांना गोड लागणारे निघालेच तर तीं नांवं पूर्वी कुठं तरी वाचल्यासारखीं वाटत, व मग तें नांव निकालांत काढावं लागे. बहुतेक प्रमुख फुलं, वृक्ष, वेली ह्यांच्या नांवांवर कुणी ना कुणीतरी ह्यापूर्वीच डल्ला मारलेला होता. काश्मिरी गुलाब, सोनचाफा, कलिका, जाईजुई, लता-मंडप, कळ्यांचे निश्वास, मोगऱ्याचीं फुलें, आंबराई, कृष्ण-कमळें, सदाफुली–छे ! कुठल्याहि फुलाजवळ किंवा वेलीजवळ मी गेलों कीं एक मज्जाव करणारा हात माझ्यासमोर उभा राही !

मग मी दुसऱ्या वर्गांतील व तिसऱ्या वर्गांतील फळाफुलांची तपासणी केली, पण तिथंहि मला तोच अनुभव आला. 'रान-फुलें–रानआवळे 'पासून 'एरंडा 'पर्यंत प्रत्येकाला कुणी ना कुणी धनी होता. अखेरीस निराश होऊन बागें-तील कचऱ्यावर मीं नजर टाकली. पण छट्–तो कचरादेखील कुणी सोडलेला नव्हता ! सुकलेलं फूल, पाला-पाचोळा, गळालेलीं पानं नि पिलकेलीं पानं यांवरदेखील कुणाचा ना कुणाचा तरी मालकी हक्क प्रस्थापित झालेला होता ! 'बनारसी बोरं ' 'नागपुरी संत्रें ', 'नाशिकचीं द्राक्षं ' 'करवंदं' वगैरे फळांचाहि कुणीतरी चट्टामट्टा करून ठेवला होता ! मला वाटलं, एखाद्या कल्पक वनस्पतिशास्त्रज्ञानं प्रयोग करून एखादं नवंच फूल किंवा फळ तयार करून त्याला एखादं नवीनच काव्यपूर्ण नांव दिल्याखेरीज कांहीं माझ्या लघुकथा-

संग्रहाला आतां ह्या वनस्पतींच्या समाजांतील एखाद्या घटकाचं नांव मला देतां येणार नाहीं !

अखेर मी बागेच्या एका कोपऱ्यांत आलों नि तिथल्या एका फुलझाडानं माझं लक्ष आकर्षित करून घेतलं. बिचारं एका बाजूला आपला पुष्पसंभार घेऊन जणूं लाजत उभं होतं. त्याचीं फुलं नुकतीच धुऊन काढल्याप्रमाणं पांढरीं स्वच्छ आणि टवटवीत दिसत होतीं. विनयशीलपणानं त्यांनीं आपल्या माना खालीं घातल्या होत्या. तीं फुलं मला एकदम पसंत पडलीं. इतक्या साध्या फुलावर अजून कुणाचं लक्ष गेलेलं नसणार, अशी मला आशा वाटत होती. बस्स ! ठरलं, माझ्या पुस्तकाचं नांव ' अनंताचीं फुलें ! '

हें नांव साधं नि सुंदर तर होतंच, पण शिवाय तें एका दृष्टीनं अर्थपूर्णहि होतं. अर्थपूर्ण येवढ्याचकरितां, कीं माझंहि नांव 'अनंत'च आहे.

" मग ठरलं का पुस्तकाचं नांव ? " प्रकाशकांनीं मला दुसऱ्या दिवशीं विचारलं.

" हो. फारच साधं, सुटसुटीत नि सुंदर आहे नांव. " मी म्हणालों.

" काय ? "

" अनंताचीं फुलें. "

" छे छे छे ! " ... प्रकाशक म्हणाले. " अहो, ह्या नांवाचंहि एक पुस्तक पूर्वीच प्रसिद्ध झालेलं आहे ! "

" असं म्हणतां ? " मी निराशेनं विचारलं, " पण माझ्या वाचनांत नाहीं आला ह्या नांवाचा लघुकथासंग्रह कधीं ! "

" लघुकथासंग्रह नाहीं ! ' अनंताचीं फुलें ' हें एका कवितासंग्रहाचं नांव आहे ! "

" त्या कवीचंहि नांव ' अनंत 'च होतं का ? "

" हो ! ... पण आतां तुम्ही असं करा, " प्रकाशकांनीं सल्ला दिला, " वाचनालयांत जाऊन मराठी पुस्तकांची यादी घ्या नि त्यांत सांपडणार नाहीं असं एखादं नाविन्यपूर्ण नांव शोधून काढा. "

त्यांचा उपदेश मला पटला. दुपारीं मी वाचनालयांत गेलों तो मोठ्या उत्साहानंच. पूर्वींच कुणीतरी वापरांत आणलेलं नांव मीं शोधून काढून काळाचा अपव्यय होण्याची आतां भीति राहिली नव्हती. वनस्पतींच्या जगांत माझ्या संग्रहाला साजेसं नांव मिळण्याची जरी आतां शक्यता नव्हती तरी अजून इतर कांहीं प्रांत संशोधनाला मोकळेच होते.

आकाश, स्वर्ग, जडजवाहीर, पंचमहाभूतं किंवा इतर कांहीं ठराविक प्रकारचीं नांवं अजून मला मोकळीं होतीं. प्रथम मी अंतरिक्षांत विहार करावयास गेलों. तिथले ते सूर्यचंद्रादि ग्रह आणि तारेनक्षत्रं, आणि दिवसाच्या निरनिराळ्या प्रहरचे निरनिराळे देखावे, ह्यांतून संग्रहाच्या नांवाकरितां निवड करावयास मला भरपूर अवसर आहे, अशी माझी कल्पना होती.

साहजिकच प्रथम चंद्रानं माझं लक्ष आकर्षित करून घेतलं. चंद्र, चंद्रमा, सुधांशु, शशांक असे कितीतरी पर्यायवाचक

शब्द त्याला होते. त्यावरून एकएक शब्द बनवीत मी वाचनालयाची यादी चाळूं लागलों—आणि एकएक नांव ' कंडम ' करूं लागलों! एखादं नवीन खंड सांपडल्याबरोबर तिथं आपलं साम्राज्य स्थापन करण्याकरितां पाश्चात्य राष्ट्रांनीं गर्दी करावी तसाच देखावा चंद्रावर माझ्या दृष्टीस पडला. इतक्या लेखकांनीं नि कवींनीं चंद्राचा कबजा घेतला होता, कीं आतां तिथं आणखी कुणा नवीन माणसाला शिरकाव करतां येणंच शक्य नव्हतं! चंद्राच्या निरनिराळ्या कलांवरदेखील निरनिराळे मालकी-हक्क प्रस्थापित झाले होते. कुणी पौर्णिमेच्या चंद्रावर तर कुणी अर्धचंद्रावर तर कुणी चवथीच्या चांदोबावर आपलं शिक्कामोर्तब करून ठेवलं होतं. त्याची कौमुदी नि ज्योत्स्नादेखील कुणी बळकावून बसला होता, तर कुणी चंद्रोदयावरहि डल्ला मारला होता. ग्रहण लागलेला चंद्रदेखील कुणीतरी राहूच्या तोंडांतून हिसकावून घेतला होता! हा प्रकार पाहून अर्थातच मग मी चंद्रावर स्वारी करण्याचा बेत सोडून दिला.

नंतर मग मी इतर ग्रहांकडे वळलों. चंद्रलोकाच्या खालोखाल लेखकांनीं व कवींनीं सूर्यलोकाची लुटालूट केलेली मला दिसून आली. सूर्याचे उदयास्त, त्याचे उज्वल किरण, इथपासून तों त्याच्या ग्रहणापर्यंत त्याची सारी मालमत्ता कुणा ना कुणाकडे गहाण होती! ह्या साहित्यिक केतूंच्या हातून त्याचा बिचारा सारथीदेखील सुटलेला नव्हता! शुक्राच्या बाबतींतहि तोच अनुभव आला. हे सारे शुभ ग्रह संपल्यावर मी दुष्ट ग्रहांकडे वळलों. म्हटलं, पूर्वीच्या लेखकांनीं निदान दुष्ट-

पणानं का होईना, पण हे अशुभ ग्रह माझ्याकरिता तसेच मोकळे सोडले असतील. पण छे, तसं कुठलं व्हायला ! कुणीं मंगळावर स्वारी करून ठेवली होती, तर कुणीं ग्रह-दशेचा फेरा व साडेसाती वाचकांच्या मागं लावून दिली होती. ताऱ्यांच्या बाबतींतहि हाच अनुभव आला. ध्रुव अढळ समजला जातो, पण आपल्या पुस्तकाला नांव देण्याकरतां एका लेखकानं त्यालाहि स्थानच्युत केला होता; आणि जाहीर केलं होतं, कीं ध्रुव ढळला ! कुणी महत्त्वाकांक्षी आणि अधाशी लेखकांनीं साऱ्या ग्रहमाला सारे ग्रह आणि तारे व अखिल तारांगण बळकावून ठेवल्यामुळं बिचाऱ्या पुढल्या एका लेखकाला तुटलेल्या ताऱ्यांवरच समाधान मानून घ्यावं लागलं होतं !

सत्तावीस नक्षत्रांतलीं सुंदरसुंदर नांवं कुणीतरी आधींच पळवलीं होतीं हें काय सांगायला पाहिजे ? कुणा भगीरथानं आकाशगंगा पुस्तकाच्या मुखपृष्ठावर आणली होती तर कुणी आकाशांत नसलेलं आकाशपुष्प देखील लंबे केलं होतं ! पूर्वीच्या लुटारू लेखकांनीं सारं अंतरिक्ष जणूं घासून—पुसून धुवून अगदीं स्वच्छ करून ठेवलं होतं ! त्यांच्या प्रति-भेच्या ‘ उच्च ’ भरारीचं हें एक प्रत्यंतर असलं तरी लेखकांच्या भावी पिढ्यांचा कांहींहि विचार न करणाऱ्या त्यांच्या लोभी वृत्तीचा मला चांगलाच राग आला. त्या रागाच्या भरांत मला वाटलं, आकाशांत इतके असंख्य तारे आहेत, त्यांतील प्रत्येकाला ज्योतिर्विदांनीं सुंदर नांवं कां नाहीं देऊन ठेवलीं ?

अंतरिक्षांतून निराश होऊन मग मी जरा खालच्या पातळीवर आलों. आणि तिथंहि मी पुरता निराश झालों ! उषा, अरुण, उषःकाल, प्रभात, सकाळ, मध्यान्ह, संध्या, मध्यरात्र, निशा वगैरे आठहि प्रहरांवर–पहाटेपूर्वीच्या काळोखावरदेखील–एकएक पहारेकरी बसलेला होता ! तिथले पांढरे ढग, काळे ढग, सौदामिनी, क्षितिज, वादळ, पाऊस ( वळवाचादेखील ), वारा (फोफावणारादेखील) ह्यांनींहि मला चार हात दूरच ठेवलं ! माझ्या पुस्तकाला एखादं साधं नांवदेखील पुरविण्यास आकाशांतील ह्या नैसर्गिक घडामोडी असमर्थ आहेत असं पाहून मी एक उसासा टाकला, आणि मग मी एकदम समुद्रसपाटीवर आलों.

माझ्यासमोर तो गंभीर निळा सागर पसरलेला होता. हा अथांग रत्नाकर तरी मला एखादं नांव पुरवील असा मला भरवसा होता; पण थोड्याच वेळांत मला मघाचाच अनुभव आला. समुद्रमंथन करून निघालेलीं चौदाहि रत्नं ह्या साहित्यिक असुरांनीं बळकावलेलीं होतीं. एवढंच नव्हे तर सागराच्या पृष्ठभागावरील नौका आणि किनाऱ्यावरील शिंपले, शंख आणि वाळूंतील पावलेंदेखील त्यांनीं आपल्या खिशांत घातलीं होतीं. कुबेरालाहि लाजवणारा असा हा रत्नाकर, पण तो आतां अगदींच दरिद्री झाला होता, आणि मला देण्याकरितां आतां त्याच्याजवळ रत्नं तर सोडाच, पण फुटके शिंपलेदेखील राहिलेले नव्हते ! त्याच्याबरोबर पंचमहाभूतांतील बाकीच्या भूतांनींहि दिवाळखोरी जाहीर केलेली दिसून येत होती !

सागराची ही कथा, तर बाहेरील जवाहरखान्याची काय गत असेल? रत्नगुंफा, रत्नमाला, हिरकण्या, वैजयंती, मुकुटमणि, उजळलेले हिरे, रत्नहार-किंबहुना कल्चर मोतीदेखील ह्या साहित्यिक दरोडेखोरांनीं आधींच लुटून नेलेलीं होतीं. तिथून मी भटारखान्याकडे वळलों, तर लेखकांचा खादाडपणाहि त्यांच्या लोभीपणाइतकाच प्रखर असल्याचा मला अनुभव आला, आणि मला उपाशीं पोटींच परत यावं लागलं. 'मनांतले मांडे 'हि मला खावयास मिळाले नाहींत!

निरनिराळ्या तऱ्हांचीं नांवं शोधून काढण्यांत मीं खूप डोकं खाजवलं; पण सारीं जुनींच नांवं मला सुचत. एकहि नवीन काव्यमय नांव आठवेल तर शपथ! नांवांचीहि काय गंमत असते पाहा! इतर वेळीं आपणाला पाहिजे तेवढीं सुंदर नि अन्वर्थक नांवं सुचतील; पण जेव्हां आपणाला त्यांची अतिशय जरूर असेल तेव्हां मात्र एकहि सुंदर नांव आपणाला सुचायचं नाहीं! माझं लग्न झालं तेव्हांहि ह्याच अडचणीचा मला अनुभव आला होता. बायकोचं नवं नांव ठेवतांना कांहीं केल्या मला एखादं सुंदर ' रोमँटिक ' नांव आठवेना नि मग जें सुचलं तें नांव तिला ठेवून मी मोकळा झालों! आणि मागाहून मात्र एकएक सुंदर नांव मला आठवूं लागलं. पण आतां त्याचा काय उपयोग होता? लग्नाची संधि माणसाला आयुष्यांतून बहुधा एकदांच येते आणि त्याचवेळीं हीं नांवं सुचलीं तर उपयोग! तसंच आमच्या घरांतल्या लोकसंख्येंत जेव्हांजेव्हां भर पडते, त्या प्रत्येक वेळींहि अगदीं हाच अनुभव

मला येतो. मुलाला कुठलं नांव ठेवावं ह्यावर खूप विचार करूनहि एखाद उत्तमसं बंगाली नांव मला सुचत नाहीं! आणि मग ऐन बारशाच्या वेळीं एखादं रांगडं मराठी नांव त्या मुलाला ठेवून झालं कीं मग मात्र एकएक सुंदर नांव सुचूं लागतं! मग हें नांव ठेवलं असतं तर किती बरं झालं असतं, तें नांव किती सुंदर दिसलं असतं, आतां पुढल्या मुलाला तरी हेंच नांव ठेवूं या! असं वाटूं लागतं. पुढल्या वेळेला, मुलगी होते आणि परत मुलगा होऊन त्याचं बारसं होईपर्यंत तें नांव विस्मृतींत कुठं तरी जें गडप होऊन जातं, तें त्याचं बारसं झाल्यानंतर एकदम वर येतं! नांवांचा हा असा लपंडाव चालू असतो!

पुस्तकाकरितां एखादं नावीन्यपूर्ण, काव्यमय, सुंदर, आकर्षक नि सुटसुटीत असं नांव शोधण्याच्या बाबतींत मी आतां निराश झालों होतो, आणि त्या निराशेच्या पोटींच माझ्या मनांत कांहीं विचार घोळूं लागले. प्रत्येक पुस्तकाला एखादं अगदीं कोरं करकरीतच नांव दिलं पाहिजे असा आग्रह कां? हा नियम कुणी केला? पंचवीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेल्या एखाद्या पुस्तकाचं नांव मीं आज माझ्या पुस्त-काला दिलं तर काय बिघडलं? पुस्तकाचं नांव म्हणजे काय एखादी स्त्री आहे का, कीं तिचं कौमार्य अभंग असलं तरच तिचं पुस्तकांशीं लग्न लावतां येतं? हो, दोन पुस्तकांत घोटाळा होऊं नये म्हणून त्यांचीं नांवं निरनिराळीं असावींत हें खरं. पण दोन पुस्तकांना एकच नांव असलं तरी

त्यांना एकमेकांपासून ओळखायला दुसरं कांहींच साधन नाहीं का? आतां प्रत्येक पुस्तकाला ‘ काव्यपूर्ण, साधं, सुटसुटीत ’ नि तरीहि ‘नावीन्यपूर्ण’ असं नांव कुठून शोधून आणायचं ? आज शंभरएक वर्षांपासून मराठींत पुस्तकं प्रसिद्ध व्हायला सुरवात झाली आहे. अलीकडे तर वर्षाला दोनतीनशें पुस्तकं प्रसिद्ध होत आहेत; मग दर वर्षी इतकीं अजिबात नवीन नांवं कुठून पैदा करायचीं ? तसं करायचं म्हटलं तर त्यांत वेळेचा आणि कल्पनाशक्तीचा किती अपव्यय होत असेल! निदान माझा तरी अनुभव असा आहे, कीं ह्या लघुकथासंग्रहाला असं नांव शोधून काढण्यांत माझ्या कल्पनाशक्तीचा जेवढा व्यय झाला, तेवढ्यांत मी दुसऱ्या एका लघुकथासंग्रहाला पुरतील एवढ्या लघुकथा लिहून काढल्या असत्या !

माणसांनाहि नांवं असतात. त्यांपैकीं कित्येकांचीं नांवं सारखींच असतात. एकदां एखादं नांव लोकप्रिय झालं कीं वडील माणसं आपल्या मुलांना तेंच नांव हौशीनं ठेवूं लागतात. मला वाटतं, सध्यां महाराष्ट्रांत बारा दिवसांपासून तें साठ वर्षांपर्यंत उमरीचें निदान पांचसहा हजार तरी ‘ अनिलकुमार ’, ‘ अशोककुमार ’, ‘ दिलीप ’, ‘ दीपक ’, ‘प्रभाकर’ , ‘सुधीर’, ‘शरच्चंद्र’ आणि ‘रवींद्र’ असतील ! मग त्यांच्यांत कसा घोंटाळा होत नाहीं ? ह्याचं उत्तर अगदीं सोपं आहे. त्यांतील प्रत्येकाच्या नांवापुढं आपल्या तीर्थरूपाचं नांव तर असतंच, (तसं पाहिलं, तर अलीकडे हीहि पद्धत कमी होऊं लागली आहे. ) पण त्यांतल्या प्रत्येकाला एक एक उपनांव किंवा आडनांवहि असतं.--‘अनिल

कुमार माधव जोशी ' हा ' अनिलकुमार दगडू गांगूर्ड्या 'पासून ह्या आडनांवामुळं सहज ओळखतां येतो. ह्या आडनांवामुळंच ' शरच्चंद्र रामचंद्र कुलकर्णी ' आणि ' शरच्चंद्र गब्रूमल गोचडीया' ह्यांच्यांत घोटाळे होण्याचा कांहींच संभव रहात नाहीं. मग हीच पद्धत पुस्तकांच्याहि बाबतींत उपयोगांत आणली तर ? म्हणजे प्रत्येक पुस्तकालाहि एकएक आडनांव दिलं तर ?

आणि तसं आडनांव पुस्तकाला ठेवणं मुळींच अवघड नाहीं. लेखकाचं आडनांव तेंच त्याच्या पुस्तकांचंहि आडनांव. नाहीं तरी लेखक पुस्तकाला आपलं अपत्य समजतोच कीं नाहीं ? मग त्याचं आडनांव पुस्तकालाहि लावायला हरकत कसली ? उदाहरणार्थ, हरिभाऊंच्या ' उषःकाल ' ह्या कादंबरीला ' उषःकाल हरि आपटे ' असं नांव द्यायचं. त्यामुळं पुस्तकाचं व लेखकाचं नांव एकसमयावच्छेदेकरून वाचकांच्या लक्षांत येतं हें तर झालंच; पण ' उषःकाल ' हें सुंदर नांव इतर लेखकांना वापरायलाहि मोकळं राहतं, हा या पद्धतीचा केवढा मोठा फायदा आहे ! 'अनिलकुमार ' किंवा ' शरच्चंद्रा' प्रमाणं मग ' उषःकाल ' हें नांव कुठल्याहि लेखकाला आपल्या वाङ्मयापत्याला ठेवावयास कांहीं हरकत नाहीं. ही पद्धत अमंलांत असती तर खांडेकरांनीं आपल्या अनेक प्रसिद्ध झालेल्या किंवा आगामी कादंबऱ्यांपैकीं एखादीला हें नांव दिलं असतं, व प्रा. फडक्यांनींहि हें सुंदर नांव तसंच सोडलं नसतं ! आणि तरीहि कांहीं घोटाळा झाला नसता. ' उषःकाल हरि आपटे ' ' उषःकाल विष्णु खांडेकर ' व ' उषःकाल नारायण फडके '

ह्या तिन्ही पुस्तकांचं व्यक्तित्व अगदीं निरानिराळं राहिलं असतं. खरंच, ही पद्धत किती साधी, काटकसरीची आणि कल्पनाशक्तीचा व कालाचा अपव्यय वांचविणारी आहे, नाहीं? महाराष्ट्रांतील लेखक ह्या पद्धतीचा अवलंब करतील का?

पुस्तकाला नांव शोधून काढण्याचा व्यर्थ खटाटोप करून निराश झाल्यावर निदान मीं तरी ठरवलं आहे, कीं माझ्या आगामी लघुकथासंग्रहाला नांव द्यायचं, तें 'प्रतिमा अनंत वर्टी' असंच!

# पुढें असलेलें घड्याळ : : २

कांहीं माणसं अतिशय तर्कशुद्ध विचार करणारीं असतात, नि दुसऱ्या माणसाचा कांहींहि भाबडेपणा दृष्टीस पडला कीं, ताबडतोब त्याच्या कृतींतील मूर्खपणा ते उघड करून दाखतात. आमचे बापूसाहेब एक ह्याच कोटींतील गृहस्थ आहेत.

" किती वाजले हो ? " एक दिवस त्यांनीं मला विचारलं.

" सव्वा नऊ. " मनगटावरील घड्याळांत पाहून मीं सांगितलं.

" सव्वा नऊ ! बापरे. मग मला पळालंच पाहिजे ! नाहींतर नऊपंचवीसाची लोकल चुकायची माझी ! " घाईघाईनं जाण्याकरितां उठून बापूसाहेब म्हणाले.

" छे छे ! तशी घाई करण्याची कांहीं जरूरी नाहीं ! " मी हंसत हंसत म्हणालों, " कारण माझं घड्याळ दहा मिनिटं पुढें आहे. "

" कशावरून पुढं आहे? " बापूसाहेबांनीं विचारलं, " नितें पुढें नसून बरोबर असलं तर? "

" कशावरून म्हणजे? अहो, माझं घड्याळ मी मुद्दामच दहा मिनिटं पुढं ठेवतों! " मी जरा आढ्यतेनंच म्हणालों.

" त्यांतला उद्देश? " पुन्हां खुर्चीवर बसतां बसतां बापूसाहेबांनीं करड्या आवाजांत विचारलं.

" म्हणजे कधींहि कुठल्या गोष्टीला उशीर व्हायला नको! घड्याळच दहा मिनिटं पुढें असलं कीं कुठल्याहि कामाला आपोआपच दहा मिनिटं आधीं सुरवात होते. " एवढं बोलून ' का? आहे कीं नाहीं वक्तशीरपणा सांभाळण्याची खाशी युक्ति! ' अशा अर्थानं मी त्यांच्याकडे पहात राहिलों.

परंतु माझ्या ह्या युक्तीबद्दल माझ्या पाठीवर शाबासकी दण्याची कांहीं बापूसाहेबांची इच्छा दिसली नाहीं. त्यांचा चेहरा किंचित् कठोर झाला. आतां माझ्या कृतींतील कांहींतरी विसंगति ते मला पटवून देणार हें मीं ओळखलं, व त्यांच्या भडिमाराची वाट पाहूं लागलों.

" छे! ही निव्वळ मनाची फसवणूक आहे! " बापूसाहेब बोलूं लागले. " आपलं घड्याळ दहा मिनिटं पुढं आहे, असं तुम्हांला जर ठाऊक असलं तर कुठल्याहि कामाला तुम्हीं दहा मिनिटं आधीं आरंभ करणार तरी कसा? कारण, प्रत्येक वेळीं तुम्हीं म्हणणार, ' ॐः! घाई करून काय करायचंय? आपलं घड्याळ दहा मिनिटं पुढं नाहीं का? आणखी दहा मिनिटांनीं ह्या कामाला सुरवात केली तरी चालेल! ' आत्तांच पहाना,

तुम्हीं मला स्टेशनवर जाण्याची इतकी कांहीं घाई नाहीं, म्हणून सांगितलं! म्हणजे काय, तर आपलं घड्याळ दहा मिनिटं पुढं असल्यामुळं आपलीं सारीं कामं वक्तशीरपणानं होतील, अशी तुम्हीं आपल्या मनाची फसवणूक करून घेतां, नाहीं का ?–"

"छे! तसं नाहीं. ही मनाची फसवणूक नाहीं..." मीं बोलण्याचा प्रयत्न केला.

"नाहीं कशी ? ही तुमची कृति तर्कशुद्ध नाहीं!" मला बोलूं न देतां बापूसाहेबांनीं आपल्या प्रवचनास सुरवात केली. नंतर त्यांनीं माझ्या ह्या मूर्खपणाबद्दल व विचार-शक्तीच्या अभावाबद्दल माझी चांगलीच खरडपट्टी काढली, व त्या भरांत त्यांची नऊपंचवीसाची लोकलदेखील चुकली, पण त्यांनीं माझी गय केली नाहीं!

थोड्या वेळानं बापूसाहेब निघून गेले, पण मी मात्र ह्यावरच विचार करीत राहिलों. कितीहि विचार केला तरी, बापूसाहेबांनीं काढलेला माझ्या कृतीचा तर्कशुद्ध निष्कर्ष मला कांहीं खोडून काढतां येईना. अखेरीस, नाइलाजानं का होईना, पण मीं स्वतःशींच कबूल केलं कीं, खरंच, आपलं घड्याळ जाणूनबुजून दहा मिनिटं पुढें ठेवणं ही मनाची शुद्ध फसवणूक आहे!

आणि तसं पाहिलं तर आपणासारखीं तर्कशुद्धतेचा फारसा विचार न करणारीं सामान्य माणसं हरघडी आपल्या मनाची फसवणूकच करीत नसतात काय ? माझ्या मनाची

ज्या बाबतींत मी फसवणूक करीत आलों आहें, अशा कितीतरी गोष्टी मला आतां भराभर आठवत आहेत.

मला सिगारेटचं व्यसन आहे. तें वाईट आहे, नि त्याच्यापासून प्रकृतीला अपाय होतो, ह्या गोष्टी मी जाणून आहें. आणि हें व्यसन ताबडतोब सोडून दिलं पाहिजे, हेंहि मला पटलेलं आहे. एकदां ह्या सिगारेट सोडण्याच्या विचारानं अतिशय जोर केला. तेव्हां तें व्यसन डिसेंबरच्या दोन तारखेला सोडून देण्याचा मी निश्चय केला. डिसेंबरची दोन तारीख मीं येवढ्याकरतांच निवडली कीं, ती त्या दिवसापासून साधारण पंधरावीस दिवसांनीं येणार होती, नि त्या तारखेस माझा वाढदिवस होता. डिसेंबरच्या दोन तारखेस जेवण होईपर्यंतचा वेळ मीं ह्या निश्चयाचं मोठ्या कसोशीनं पालन केलं. पण मग वाढदिवसाचं चमचमीत जेवण होऊन विडा खाल्लयावर त्या आनंदाला पूर्णत्व आणण्याकरतां, जानेवारीच्या एक तारखेला सिगारेट खरोखरीच सोडून देण्याचं वचन मनाला देऊन मीं एक सिगारेट शिलगावली. जानेवारीच्या एक तारखेला ब्रिज खेळतांना लवकरच येणाऱ्या गुढी पाडव्याच्या सुमुहूर्तावर हें वाईट व्यसन सोडून देण्याचा संकल्प सोडून मी धूम्रपान करूं लागलों. गुढी पाडव्याला एक गोष्ट लिहावयास घेतली, नि स्फूर्तीला चालना मिळावी, व मेंदूचा शीण घालवावा, ह्या दुहेरी हेतूनं मी धूम्रपान करून, सिगारेट सोडण्याचा निश्चय दसऱ्याच्या सुमुहूर्तावर ढकलून दिला. सारांश काय, तर

हें सिगारेटचं व्यसन–जें वाईट आहे आणि जें नक्की सोडून देण्याचा मीं निश्चय केलेला आहे!—तें मला अजूनहि आहेच!

माझ्या मनाला खर्च करणं आवडत नाहीं. मलाहि आवडत नाहीं. पण जेव्हां माझ्या लघुकथेला बक्षिस मिळालं, तेव्हां मी बराच खर्च केला. त्या महिन्यांत मीं सिगारेट्स खूपच ओढून घेतल्या. मन म्हणालं, "काय हा पैशाचा अपव्यय!" मी म्हणालों, "केला एखादे वेळ पैशाचा अपव्यय तर त्यांत काय बिघडलं? शिवाय त्यांत तुझं काय गेलं? लघुकथांच्या चढाओढींत मला बक्षिस मिळालं आहे. त्या रकमेंतून मी हा खर्च करतोंय!" ह्याच वेळीं बायकोकरतां मीं एक नवं पातळ आणलं. अर्थातच माझ्या कंजूष मनाला तें आवडलं नाहीं. तें म्हणालं, "काय हा नसता खर्च! तिला पुष्कळ पातळं आहेत कीं!" मी "त्यावर चर्चा करण्याचा तुला बिलकूल अधिकार नाहीं!" असा ठणठणीत जबाब देऊन त्याला गप्प बसवलं. नंतर मी स्वतःकरतां एक भारी सूट करण्याचा विचार केला, आणि मनाची थोडीशी चुळबुळ दिसतांच, हेंच उत्तर देऊन मी मनाला निरुत्तर केलं. दोन दिवसांनीं मुलींकरतां भावल्या, व मुलाकरतां एक ट्रायसिकल आणली; आणि शेवटीं सर्व मित्रमंडळीस बक्षिस मिळाल्याच्या आनंदाप्रित्यर्थ एक झकास पार्टी दिली. हा सारा खर्च मी मला मिळालेल्या बक्षिसाच्या रकमेंतूनच केला, अशी आतांपर्यंत तरी माझी समजूत होती.

पण आतां, बापूसाहेबांनीं तर्कशुद्धतेची दिव्यदृष्टि मला दिल्यावर मात्र मला कळून आलंय कीं, ह्या प्रत्येक बाबतींत मी माझ्या बिचाऱ्या मनाची फसवणूकच करीत आलोंय ! सिगारेट सोडून देण्याचा निश्चय मी पुढेंपुढें ढकलतों, ह्याचा सरळ अर्थ एकच, कीं मला सिगारेट सोडायची नाहीं. पण मनाला तसं स्पष्ट सांगून मला त्याला दुखवायचंहि नाहीं. आतां हिशोब करून पाहिला, तर मला बक्षिसाची जेवढी रक्कम मिळाली होती, त्याच्या पांचसहा पट रक्कम, मला बक्षिस मिळालंय नि त्यांतून मीं हा खर्च करतोंय, ह्या सबबीवर मी खर्चून टाकली होती ! माझ्या कंजूष मनाला न दुखवितां आपलं काम साधून घेण्याकरतां मी ह्या बक्षिसाच्या रकमेचा उपयोग करून घेतला होता. मी माझं घड्याळ पुढं ठेवतों तें वक्तशीरपणाविषयीं कटाक्ष असलेल्या माझ्या मनानं आरामशीर आयुष्य घालविण्याची आवड असलेल्या माझ्यासारख्या माणसाच्या मागं उगाच ‘ तास वाजे ठणाणा’ असं टुमणं लावूं नये म्हणून !

आपलं मन हें एखाद्या ऑफिसमधल्या हेडक्लार्कसारखं आहे. आपल्या हाताखालील कारकूनांनीं वक्तशीर असावं, सचोटीनं वागावं, प्रत्येक कामांत चलाखी दाखवावी, आळसांत एक क्षणहि दवडूं नये, वगैरे वगैरे अपेक्षा ज्या प्रमाणं त्या हेडक्लार्कच्या असतात, त्या प्रमाणंच, तुम्हीं आम्हीं सर्व सद्‌गुणांचे पुतळे बनावं, तिजोऱ्या भरून पैसे कमवावेत, अशी आपल्या मनाची इच्छा असते. त्या हेतूनं तें

जणूं नेहमीं हातांत एक छडी घेऊनच बसलेलं असतं. त्याच्या इच्छेविरुद्ध कांहीं स्पष्ट बोलण्याची किंवा उघड उघड करण्याची आपली छाती नसते. म्हणून मग, क्रिकेटचा सामना पहावयाचा असला म्हणजे एखादा कारकून जशी आपली आजी मेल्याची सबब सांगून ऑफिसला दांडी मारतो, त्याप्रमाणंच निरनिराळ्या युक्त्या योजून आपणांलाहि आपल्या मनाला फसवावं लागतं, आणि अशा आडमार्गानं आपला कार्यभाग साधून घ्यावा लागतो. आपलं मन फारच सद्गुणी, कर्तव्यकठोर, तर्कनिष्ठुर, व शक्तिमान् असतं. एखादी त्याला न आवडणारी गोष्ट आपणाला करायची असली, नि त्याकरतां त्याची सरळ सरळ परवानगी मागितली तर तें तशी परवानगी मुळींच देणार नाहीं. त्याच्यासमोर वादाला बसलं, तर बापूसाहेबांसमोर माझी गत झाली, तशीच आपली गत व्हायची! आणि शेवटीं मनाची आज्ञा शिरसावंद्य मानून त्या गोष्टीचा विचार सोडून देण्याची पाळीच आपणावर यायची!

पण आपणहि कांहीं कमी नसतों. मनाला हातोहात फसविण्याकरतां आपणहि नामी युक्त्या शोधून काढतों, आणि मनानं नाकारलेल्या सुखाची नि स्वातंत्र्याची आपण चव घेतों. मीं जर माझं घड्याळ दहा मिनिटं पुढं ठेवलं नसतं, तर प्रत्येक काम वेळच्या वेळींचं झालं पाहिजे असा कटाक्ष असणाऱ्या माझ्या मनानं मला एक क्षणाचीहि उसंत मिळूं दिली नसती. एखाद्या सुमुहूर्तावर सिगारेट सोडण्याचीं खोटीं वचनं मीं

मनाला दिलीं नसतीं, तर मनानं मला सिगारेट हातांत देखील धरूं दिली नसती. बक्षिसाच्या रकमेंतून मी सारा खर्च चालविला आहे, अशी लोणकढी मी मनाला दिली नसती, तर माझा महिन्याचा काळ जो मजेंत गेला, तो तसा गेला नसता.

आपलं मन सर्व शक्तिमान् आहे. त्याला आपण उघड उघड विरोध केला तर तें युद्धाला उभं टाकतं, नि त्या गडबडींत आपल्या सुखाची मात्र राखरांगोळी होऊन जाते. हा प्रकार टाळण्याकरतां, तर्कदृष्ट्या चूक अशा गोष्टींनी आपणाला आपल्या मनाची फसवणूक करावी लागते.

आपल्या रोजच्या आयुष्यांत आपण अति तर्कशुद्ध विचार करीत नाहीं, हेंच ठीक! उठल्या सुटल्या असा तर्कशुद्ध विचार केला, व मनाची फसवणूक करणं बंद केलं, तर आपण कितीतरी बारीकसारीक सुखांना मुकूं आणि आपलं आयुष्य रुक्ष, यांत्रिक, नि निरस बनवून टाकूं.

# ब्रिजमधल्या मौजा : : ३

एके काळीं मी ब्रिजच्या खेळाला ' म्हाताऱ्यांचा खेळ ' असं संबोधून त्याची हेटाळणी करीत असे. पण आतां माझं मत बदललेलं आहे. काळाला दाखविण्याकरतां जरी माझ्या डोक्यावर मी शरणागतीचीं पांढरीं निशाणं तुरळक उभारलीं असलीं तरी ' म्हातारा ' ह्या संज्ञेला मी पात्र झालों आहें, असं मला वाटत नाहीं. किंबहुना, मला कोणी ' म्हातारा ' म्हणून म्हटल्यास मला रागच येईल, व मी अजून पुष्कळच तरुण आहे, ह्याचं शारीरिक प्रत्यंतर माझ्या हातांतल्या शक्तीनं मी त्याच्या गालावर देऊ शकेन ! असं असलं तरी अलिकडे मला ब्रिज आवडूं लागलं आहे खरं.

मी क्रिकेटचा मोठा भोक्ता होतों, व आहेंहि. क्रिकेट हा मैदानी खेळांचा राजा आहे. तसाच ब्रिजहि बैठया खेळांचा राजा आहे. दोन्ही खेळांतील मुख्य गोडी त्यांतील अनिश्चिततेवरच आहे. धाडस, दूरदृष्टि, धूर्तपणा, चापल्य ( एकांत

शारीरिक तर दुसऱ्यांत बौद्धिक ) वगैरे गुण दोन्ही खेळांच्या खेळाडूंच्या अंगीं आवश्यक आहेत. आणि म्हणूनच चुरशीनं खेळला जाणारा क्रिकेटचा सामना जितका प्रेक्षणीय, तितकाच ब्रिजचा खेळहि प्रेक्षणीय आहे.

मी अलिकडेच ब्रिज खेळावयास शिकलों आहें, तरी पण ब्रिज खेळण्यापेक्षां पाहण्यांतच मला अधिक मौज वाटते. चला आमच्या क्लबमध्यें, म्हणजे ब्रिज पाहण्यांतहि काय मौज असते, तें तुम्हाला कळून येईल.

संध्याकाळ झालेली असल्यामुळं क्लबच्या हॉलमध्यें थोडासा अंधार आहे. हें पाहा, एक 'ब्रिजमंडळ'— म्हणजे ब्रिजचे चार खेळाडू-आलें. पार्टनर्स निवडण्याकरतां त्यांनीं एका पत्त्याच्या 'कॅट' मधून पानं काढलीं. डोळे आणि मुळे व खाड्ये आणि ताड्ये असे भिडू निघाले. सर्वजण आपआपल्या जागांवर एका टेबलाभोंवतीं बसले. क्लबबॉयनं येऊन दिव्याचं बटन दाबलं. त्याबरोबर एकदम तीन दिवे लागल्याचा तुम्हांला भास होईल. पण त्यांतला वर तक्तपोशीला टांगलेला तेवढा एक खरा विजेचा दिवा आहे, आणि दुसरीं दोन, त्या दिव्याचा प्रकाश परावर्तित करणारीं खाड्ये आणि डोळे ह्यांच्या उत्तमांगांवरील संगमरवरी टकलं आहेत. हा वेळ-पावेतों डोळ्यांनीं पत्ते वाटले आहेत, आणि सर्व खेळाडूंनीं मोठ्या खुषींत खेळावयास सुरवात केली आहे.

"एक क्लब!"— डोळे.

"एक हार्ट!"— खाड्ये.

" एक नोट्रंप ! "—जरासा विचार करून—म्हणजे ' मिशी ' हें महत्त्वनिदर्शक नामाभिधान प्राप्त झालेल्या नाकपुड्यां-खालील चार पिंगट खुरट्या केसांशीं एक मिनिटभर हिसका-हिसकी करून—मुळे.

" एक क्लब !... एक हार्ट !...एक नोट्रंप ! "—जिन्हांनीं हिन्दुधर्म स्विकारला ही बातमी ऐकतांच होईल तसा चेहरा करून ताड्ये–" ही काय भानगड आहे बुवा ! स्टंटच करता-हेत कीं आमचे पार्टनर ! "

ताड्यांचे पार्टनर खाड्ये फक्त एक रागाचा दृष्टिक्षेप ताड्यां-कडे टाकतात, आणि ' कॉलिंग ' पुढं चालू होतं.

अखेरीस डोळे आपल्या टकलावरून वर्तुळाकार हात फिर-वीत म्हणतात, " चार स्पेड ! "

" पास ! "–तांड्याकडे–आपल्या पार्टनरकडे–रागाचा एक कटाक्ष टाकून खाड्ये.

" पास ! " आपल्या ढेकूणकट् मिशीला पुन्हां एकदां एकदोन हिसके देऊन, एकाद्या न्यायाधीशानं खुनाच्या खट-ल्याचा निकाल द्यावा, तितक्या गंभीरपणानं—मुळे.

" पास ! " मग आतां आपला काय इलाज ? अशी मुद्रा करून व आपला पार्टनर म्हणून आपल्या समोर बसलेले खाड्ये हे कुठल्या जातीचे प्राणी आहेत ? अशी पुच्छा कर-णाऱ्या दृष्टीनं त्यांच्याकडे पहात ताड्ये.

खाड्ये उतारी करतात, मुळे आपलीं पानं खालीं मांडतात, आणि एखादी टाचणी पडली तरी तिचा आवाज ऐकूं येईल

अशा शांततेंत, व क्लबमध्यें एखादा मेंबर मरणोन्मुख अवस्थेंत पडलेला असावा अशा गांभीर्यात डावाला सुरवात होते.

थोड्याच वेळांत डाव आटोपतो—एक 'डाऊन' येतो, आणि डोळे मुळ्यांवर एकदम तुटून पडतात,

"तुमच्याजवळ 'हार्टचा' 'होल्ड' नाहीं नि त्यांच्या हार्टच्या कॉलवर 'नोट्रंप' कसा दिला?"

"मी माझ्याजवळची दीड 'ट्रिक्' दाखवली!"—मुळे.

"ती दीड 'ट्रिक' काय चाटायची होती? तुमच्याजवळ हार्टचे दोन होल्ड धरूनच मी कॅल्क्युलेट केलं होतं!"—डोळे.

"तरीपण 'कॉल' 'फुलफिल्' होत होता.—तुम्ही जर क्लब जॅकचा फिनॅस घेतां"—मुळे-

"फिनॅस कसला घेतां? मग त्यांचा क्लब टेन् सुटतो ना!"—डोळे.

ह्या वेळीं खाड्ये आणि ताड्ये मोठ्या खुषींत असतात, व पुस्तकांत आपले मार्क हंसत हंसत मांडीत असतात. दुसऱ्या डावाचीं पानं वाटून होईपर्यंत डाळे आणि मुळे एकमेकांचीं उणीं काढीत असतात. त्यांचं आपसांतील भांडण खाड्ये आणि ताड्ये मोठ्या गंमतीनं पाहात असतात. खाड्यांचीं पानं वाटून झाल्यावर पुन्हां दुसऱ्या डावास सुरवात होते. ताड्यांचा 'चार हार्ट'चा कॉल स्टँड होतो. डोळे उतारी करतात. खाड्यांचीं पानं खालीं येतात. तीं पाहतांच ताड्ये एकदां तोंड वेतंवांकडं

करतात. आणि पुन्हां एकदां भेसूर शांततेंत खेळाला सुरवात होते.

डाव संपतो. दोन 'डाऊन' येतात, व ताड्ये खाड्यांवर एकदम संतापून खेकसतात, "तुमचा एक डायमंडचा कॉल खोटा, पार्टनर?"

"खोटा कसा?"—खाड्ये.

"मग सोळा काऊंट्स कुठं आहेत दाखवा पाहूं!"—ताड्ये.

"तें काऊंट्सबिऊंट्स मी नाहीं जाणत. तीन 'ट्रिक्स्' आहेत कीं नाहींत, पाहून घ्या."—खाड्ये.

"तुम्ही काऊंट सिस्टिमनं खेळायला लागल्याशिवाय तुम्हांला खरं ब्रिज यायचं नाहीं!"—ताड्ये.

"बरं! बरं! तुम्ही मोठे कल्बर्टसन लागून राहिले कीं नाहीं!"—खाड्ये.

ह्यावेळीं डोळे आणि मुळे आपणांला मिळालेले मार्क मोठ्या खुषीनं वहींत मांडीत असतात. डोळयांच्या दृष्टीनं मुळयांची, व मुळयांच्या दृष्टीनं डोळयांची उतारींत एकएक चूक झालेली असली, तरी डावाचा एकंदर रागरंग पाहून नुसता त्या चुकांचा निर्देश करून त्यांनीं एकमेकांना मोठ्या उदार मनानं क्षमा केलेली आहे. खाड्ये आणि ताड्ये ह्या पार्टनर्समधील बौद्धिक लढत आतां चांगलीच रंगांत आलेली आहे. आपल्या पार्टनरचं उणं काढण्यापेक्षां तीच पाहाणं-निदान सध्याच्या परिस्थितींत तरी-त्यांना अधिक पसंत आहे.

आणि प्रत्येक वेळेला ह्याच प्रकाराची पुनरावृत्ति चालू आहे. डाव मोठ्या शांततेंत चालतो, पण तो संपलारे संपला कीं मधमाशांचं मोहोळ उठावं तसा गलका होतो आणि प्रत्येकजण आपल्या पार्टनरवर तुटून पडतो.

ब्रिज खेळण्यापेक्षां पाहण्यांत जी मजा असते ती हीच. तुम्हांला ब्रिजमधलं 'गमभन' येत नसेल, 'क्लब', 'स्पेड', 'ऑनर ट्रिक', 'नोट्रंप' ह्या काय भानगडी आहेत ह्याची कांहींच कल्पना नसेल, तरी पण ब्रिजमधली पार्टनर्सची ही लठ्ठालठ्ठी पाहून तुमची चांगलीच करमणूक होईल! डाव चालू असतां तुम्ही खुशाल बागेंत दोन चकरा मारून या, किंवा टाईम्स वाचीत बसा, पण डाव संपल्याबरोबर मात्र नीट लक्ष देऊन पाहा. कारण खुद्द खेळापेक्षांहि नंतर ही जी डावाची मरणोत्तर तपासणी चालते, ती पाहणंच फार मनोरंजक असतं.

ब्रिजकरतां आवश्यक असणाऱ्या धाडस, स्मरणशक्ति, बौद्धिक चापल्य वगैरे खेळाडूच्या अंगच्या सर्व गुणांची खरी चमकहि ह्याच वेळीं दिसून येते. ब्रिज खेळण्यांतला मुख्य भाग हाच आहे. हे गुण जर तुमच्या अंगीं नसतील, तर डाव संपल्यावर तुमच्या पार्टनरपुढं तुमचा मुळीच टिकाव लागणार नाहीं, आणि एक रद्दी ब्रिजप्लेयर अशी तुमची दुष्कीर्ति होईल!

पार्टनर घेऊन खेळल्या जाणाऱ्या इतर खेळांमध्यें आणि ब्रिजमध्यें हाच मुख्य फरक आहे. टेनिस, बॅडमिंटनसारख्या खेळांवरून तुमची कल्पना होईल कीं पार्टनर हे एकमेकांना

मदत करण्याकरतां घेतलेले असतात. दोघांनीं मिळून एकजुटीनं खेळायचं असतं. ह्यावरून ब्रिजमध्येंहि ह्याच उद्देशानं पार्टनर घेतले जात असतील, असा जर तुम्ही तर्क केलात तर तो मात्र सपशेल चुकीचा ठरेल. ब्रिजबद्दलचा माझा आतांपर्यंतचा जो अनुभव आहे—खेळाडू व प्रेक्षक ह्या दोन्ही नात्यांनीं—त्यावरून मी तर अगदीं छातीठोकपणानं सांगेन कीं ब्रिजमधले पार्टनर्स एकमेकांच्या विरुद्ध खेळण्याकरतांच घेतलेले असतात.

आपल्या पार्टनरच्या चुका दाखवून त्याला मूर्खांत काढणं हाच ब्रिज खेळण्यांतला मुख्य उद्देश असावा, अशी माझी समजूत आहे. आपला पार्टनर मूर्ख आहे, त्याला 'कॉलिंग'चे नियम कळत नाहींत, त्याला सारासार विचारशक्ति नाहीं, असं गृहित धरूनच ब्रिज खेळायला बसायचं असतं. खेळ चालू असतां आपला पार्टनर काय काय चुका करतो, ह्यावर बारीक नजर ठेवायची असते. आणि डाव संपला कीं ताबडतोब त्याच्या चुकांचं पुरेपूर माप त्याच्या खिशांत घालायचं असतं. अर्थात्, आपला पार्टनरहि ह्याच उद्देश डोळ्यासमोर ठेवून खेळत असल्यामुळं डाव संपल्याबरोबर तोहि आपणावर असाच उलटून पडणार, हें निश्चित. ह्याकरतां ब्रिजच्या नियमांचा आणि पोटनियमांचा आपला अभ्यास दांडगा पाहिजे. म्हणजे मग नाना तऱ्हेच्या पळवाटा काढून आपणाला त्याचे आरोप खोडून काढतां येतात. त्यानं अमुक एक 'ट्रिक्स' कुठं म्हणून विचारलं, तर आपण 'काऊंट्स'ची बेरीज करून दाखवावी. डाव घाल-विल्याबद्दल त्यानं दोष दिला तर चान्सेस उलटे पडले म्हणून

सांगावं. आपल्यासमोर बसलेला आपला पार्टनर हा आपला शत्रू आहे, असंच गृहित धरून ब्रिजमध्यें खेळावं लागतं. तो आपल्या बाजूचा आहे, असा जरी पहिले एकदोन डाव गैरसमज करून आपण खेळलों, तरी लवकरच तो मित्राचं कातडं पांघरलेला शत्रू आहे, हें उघड होतं, व तो आपल्या उलट डावपेंच करूं लागतो. जगांतला महामूर्खांतला महामूर्ख माणूस आपणांला नेहमीं पार्टनर मिळतो हें लक्षांत ठेवा. त्याचप्रमाणं आपल्या पार्टनरचीहि आपल्याविषयीं अगदीं हीच समजूत असते हेंहि ध्यानांत ठेवा, व त्याचे हल्ले परतवून लावण्यास हुषार रहा.

सहज आठवलं म्हणून सांगतों. श्री. गाजरे अगदीं ब्रिजवेडे होते. सूर्यानं समुद्रांत बुडी मारल्यापासून तों तो परत उदयाचलावर येईपर्यंत ते ब्रिज खेळत बसत. त्यांचा सुमतीशीं वाङ्‌निश्चय झाला होता. सुमतीहि बी. ए. (ऑनर्स) होती. अर्थात् बुद्धिमंतांचा खेळ जो ब्रिज, तो खेळण्याची तिची लायकी होतीच. आपल्या वाग्दत्त वधूला क्लबांत आणून श्री. गाजरे मोठ्या हौशीनं ब्रिज शिकवूं लागले.

तिला ते आपली पार्टनर करीत व डाव संपला कीं तिच्या चुका तिला दाखवून देत. जोंपर्यंत ती नवशिकी होती, तोंपर्यंत त्या चुका ती मोठया आनंदानं मान्य करी; व इतके नियम, पोटनियम, इतक्या खुब्या, इतके डावपेच, येवढी सारासार विचारशक्ति ज्या डोक्यांत सामावलेली आहे, त्या श्री. गाज-

ऱ्यांच्या डोक्याकडे ती कौतुकमिश्रित प्रेमपूर्ण दृष्टीनं पाहात राही. त्यांचा उल्लेख ती ‘ गुरूजी ’ म्हणून अत्यादरानं करी.

पण नंतर मग श्री. गाजऱ्यांच्या परिश्रमांनीं ती ब्रिजमध्यें जसजशी पारंगत होऊं लागली, तसतशी ती श्री. गाजऱ्यांनीं तिच्या चुका दाखविल्या कीं आपलं समर्थन करूं लागली. जेव्हां तिला वाटूं लागलं कीं, आतां आपलं ब्रिजविषयींचं ज्ञान गाजऱ्यांइतकं तरी झालेलं आहे, तेव्हां ती हळूहळू श्री. गाजऱ्यांच्या चुका नम्रपणानं सुचवूं लागली. आणि शेवटीं कल्बर्टसन तरी आपल्यापेक्षां ब्रिजमध्यें अधिक निष्णात असेल कीं नाहीं, अशी जेव्हां तिला शंका वाटूं लागली, तेव्हां तर ती श्री. गाजऱ्यांच्या चुका स्पष्टपणें दाखवून त्यांची सर्वांदेखत खरडपट्टीच काढूं लागली.

एक दिवस श्री. गाजरे व सुमति पार्टनर होऊन ब्रिज खेळत होते. एक डाव संपल्यावर सुमतीनं त्यांना विचारलं, “ मी पहिली ‘ स्पेड ’ची ‘ लीड ’ दिली, तेव्हां तुम्ही एक्का कां नाहीं लावला ? ”

“ पण तूं तरी ‘ फोर्थ हाय्येस्ट ’ कां नाहीं खेळलीस ? ” —श्री. गाजरे.

“ मी वाटेल तें केलं असेल, पण तुम्ही थर्ड मॅन द हाय्येस्ट नको का खेळायला ? छे ! तुम्ही त्या वेळीं एक्का टाकतां तर सरळ चार ‘ डाऊन ’ आले असते त्यांचे. त्यांची राणी आयती ‘ ट्रूप ’ होत होती ! ”

" पण तूं डायमंड कां नाहीं खेळलीस आधीं ? माझा डायमंडचा डेफिनिट् कॉल होता ! शिवाय स्ट्राँगेस्ट ऑफ द डमी म्हणून..."

" पण तुमची डायमंड कुठं पळून का जात होती ? "

" मग ? मला फुकट डायमंड जाळावी लागली ना हार्टवर ! "

" आणि मला स्पेड जाळावी लागली ती ! तुम्हाला ब्रिजचे साधे नियमदेखील कळत नाहींत ! "

" इतके दिवस तुला शिकवलं–येवढ्या दिवसांत मठ्ठांतला मठ्ठ माणूसदेखील तयार झाला असता ! "

" कोण मठ्ठ ?...गाजरपारखी आहांत झालं ! "

" होय ! म्हणूनच तर तुझ्याशीं लग्न करायला तयार झालों ! "

" तुम्ही गाढव आहांत ! "

" तूं गाढवाची बायको होणार आहेस ! "

दोघांच्या जाती आणि लक्षणं तंतोतंत जुळलीं तरी त्यांचं लग्न मात्र फिसकटलं. श्री. गाजऱ्यांनीं ब्रिजकरतां एक पार्टनर तयार केली, पण जन्माची पार्टनर मात्र गमावली !

ब्रिजमधल्या कॉलिंगमुळं आपल्या हातांतील पत्त्यांची माहिती आपल्या पार्टनरला अगदीं स्पष्टपणानं देतां येते, किंवा देतां यावी, असा ब्रिजवर पुस्तकं लिहिणाऱ्या ब्रिजपटूंचा दावा आहे. कदाचित् तात्त्विकदृष्ट्या त्यांचं तें म्हणणं बरोबरहि असेल, पण प्रत्यक्षांत मात्र पार्टनर आपल्या पार्टनरला चकवण्या-

करतांच, भलत्याच मार्गाला लावण्याकरतां, कॉलिंगचा उपयोग करतांना दिसून येतो. वस्तुस्थिति अशी आहे कीं आपल्या कॉलमुळं आपल्या पार्टनरला आपल्या हातांतील पत्त्यांचा एक वेळ अचुक अंदाज लागला तर नव्याहण्णव वेळेला त्याचा बरोबर गैरसमज होतो. एक ' नोट्रंप 'चा कॉल आपण दिला म्हणजे आपल्याजवळ दोन एक्के व एक राजा, किंवा एक एक्का, एक राजाराणीचं जोडपं, व एक विरही राजा आहे, येवढी बातमी आपल्या पार्टनरला हमखास मिळते. पण इथंच सारा घोटाळा होतो. तो धरतो आपल्याजवळ इस्पिकचा एक्का व आपल्याजवळ निघते इस्पिकची राजाराणी. आपल्याकडे राजा असतो बदामचा, व तो समजतो चौकटचा. आणि चुकीची समजूत प्रथमच झाली कीं शेवटीं डाव घरंगळणार हें निश्चित. आणि डाव अंगावर आला कीं कोणीहि माणूस आपली स्वतःची चूक थोडीच कबूल करणार? मग तो साऱ्या चुकांचं खापर आपल्या पार्टनरच्या डोक्यावर फोडणार हेंहि निश्चित! यांत खरं पाहतां दोघांचाहि दोष नाहीं. दोष आहे तो सध्यांच्या कॉलिंगच्या पद्धतीचा. म्हणूनच केव्हां केव्हां ह्या कॉलिंगच्या पद्धतींत थोडीशी सुधारणा सुचवावी, असं मला वाटतं.

' एक नोट्रंप 'चा कॉल देऊन आपल्याजवळ दोन एक्के व एक राजा आहे, असं मोघमपणानं सांगण्यापेक्षां ' माझ्याजवळ किलवर व चौकटचा एक्का व बदामचा राजा आहे ' असं स्पष्ट सांगितलेलंच काय वाईट? आपल्या हातांतील

पानांची आपल्या पार्टनरला अचूक माहिती करून देणं हाच जर कॉलिंगचा उद्देश आहे असं मोठमोठे ब्रिजपटू म्हणतात, तर मग प्रचलित सदोष पद्धतीनं होणारे घोटाळे टाळण्याकरतां ह्या नवीन पद्धतीचाच अवलंब कां करूं नये ? ह्या पद्धतींत नंतर जसजशी सुधारणा होत जाईल तसतसं मग आपल्या हातांतील तेराहि पानं कुठलीं आहेत, ह्याची आपल्या पार्टनरला सुस्पष्ट माहिती देणं, अधिक सुकर होत जाईल, आणि ब्रिजचा खेळ आहे त्यापेक्षांहि अधिक शास्त्रीय होईल !

पण खरं विचाराल तर ब्रिजच्या कॉलिंगची ही नवी पद्धत अंमलांत आणावी अशी कांहीं माझी मनांतली इच्छा नाहीं. त्यामुळं ब्रिजमधली अनिश्चिततेची सारी मौज नष्ट होणार आहे. क्रिकेटचा खेळ बेभरंवशाचा आहे म्हणूनच त्यांत मजा आहे. ओव्हरबाऊंडऱ्या मारण्याच्या मोठ्या ईर्षेनं आपली बॅट पाजळीत क्रीडांगणावर आलेले मेजर नायडू शिरोवर उडाले, तरच मॅचला रंग भरतो. विजय मर्चंटनं पहिल्याच चेंडूला ‘ स्लिप् ’मध्यें झेल दिला कीं, मनाला थोडंसं वाईट वाटलं तरी, डोळ्यांचं पारणं फिटल्यासारखं वाटतं. ही अनिश्चितता आहे म्हणूनच क्रिकेटची मौज आहे. तसंच ही अनिश्चितता आहे, म्हणूनच ब्रिजचीहि मौज आहे. आपला पार्टनर कॉल देण्यांत केव्हां चूक करील

ह्याचा नेम नसल्यामुळेंच ब्रिजमध्यें गंमत आहे. ब्रिजमधली ही अनिश्चितता नाहींशी झाली तर मग कुठले ते पार्टनरां-मधले समजुतीचे घोटाळे! आणि समजुतीचे घोटाळे नसले तर मग कुठल्या त्या पार्टनरांमधल्या लठ्ठालठ्ठया! आणि पार्टनरांमध्यें लठ्ठालठ्ठया नसल्या तर कसलं तें ब्रिज!

# बोहरी ! : : ४

चार फूट लांबो, तीन फूट रुंदो आणि आठएक फूट उंची ! हीं एखाद्या कपाटाची मोजमापें नव्हेत. मोठमोठ्या दुकानांनी गजबजलेल्या राजरस्त्यावरील हें एक बोहऱ्याचें दुकान आहे. पैसे दिल्यास, त्यांत फोटोंना चौकटी लावून मिळतात. ह्या दुकानाच्या भिंतींचा रंग तुम्हांला ओळखतां येणार नाहीं. कारण त्या सर्व फोटोंनीं व्यापून टाकलेल्या आहेत. त्यानें आपल्या दुकानांत एखादा गालीचा वगैरेहि अंथरलेला नाहीं, तरी त्याच्या दुकानाचा पृष्ठभागहि तुम्हाला दिसूं शकणार नाहीं. शक्य तेवढ्या कमी जागेंत आपल्या अंगाची गाटोडी वळून तो काम करीत बसला आहे. त्याच्या आजूबाजूची तसून् तसू जागा लाकडी रिफा, लहानमोठे खिळे, आणि पकडी, हातोड्या इत्यादि सुतारी हत्यारें ह्यांनीं व्यापून गेलेली आहे.

त्या बोहऱ्याला फक्त हनुवटीच्या खालच्या भागाला एक लहानशी दाढी आहे. ती लहानमोठी होतांना अजून कोणी

पाहिलेली नाहीं. त्याच्या डोक्यावर मागच्या बाजूला दाबून घट्ट बसविलेली लहानशीच टोपी आहे. तिच्यावरील जरीची वेलबुट्टी आतां काळी पडलेली आहे, आणि तिचा काळा भाग त्याच्या केसांतून शोषून घेतलेल्या तेलानें अधिकच काळा दिसत आहे, त्याचें दुकानहि छोटेसेंच आहे—पण त्याचें उत्पन्न मात्र मोठें आहे.

आज चार वर्षें झालीं; त्याचें तें छोटेसें दुकान आमच्या चाळीच्या खालच्या मजल्याला आहे. एखाद्या पानपट्टीच्या दुकानाला पुरेल, इतकीच जागा त्यानें व्यापलेली आहे. त्याच्या दुकानांत फारफार तर शंभर एक रुपये किंमतीचा माल असेल. ह्या हिंदुमुसलमानांच्या तेढीच्या दिवसांतहि भर हिंदु वस्तींत आपलें दुकान ठेवावयास तो डरत नाहीं. एखाद्या दंग्यांत दुकान लुटलें गेलें, तरी त्याची त्याला पर्वा नाहीं. कारण तो पुरतेपणीं जाणून आहे कीं दुकानांतील त्या शंभर रुपयांच्या मालापैकीं फक्त पंचवीस रुपयांचा मालच आपला आहे! बाकीचा पंचाहत्तर रुपयांचा माल हिंदूंचाच आहे!

तो व्यापार कसा करावा, हें कोठेंच शिकला नाहीं, माशाच्या पिलाला पोहणें शिकवावें लागत नाहीं, मांजराच्या पिलाला उंदराची शिकार करावयास कोणी शिकवीत नाहीं, तसेंच बोहऱ्याच्या पिलालाहि व्यापारधंदा शिकावयास एखाद्या व्यापारी विद्यालयांतून शिक्षण घ्यावें लागत नाहीं. त्याच्या वरच्या ओठावर आणि हनुवटीवर केंस उगवूं लागले, तेव्हांच

त्यानें आपलें स्वतंत्र दुकान थाटलें. तें वाढविण्याचा त्याचा मुळींच विचार दिसत नाहीं. त्यापासून त्याला किती प्राप्ति होते ह्याची त्याच्याखेरीज कोणालाच कल्पना नाहीं. त्याचा पोषाख चार वर्षांपूर्वी पाहिला होता, तसाच अजूनहि आहे. त्याच्या लांब मळकट शर्टावर एक काळें जाकीट आहे. अस्तन्या वर सारलेल्या आहेत, खालीं एक तंग विजार आहे, आणि पायांत फाटके बूट आहेत. त्याला कधीं कोणी बोडका पाहिलेलें नाहीं. तो आजूबाजूच्या लोकांत मिसळत नाहीं. त्याच्या दुकानांत त्याच्याशीं गप्पा मारण्यास येऊन बसलेला दुसरा बोहरी अजून कोणी पाहिलेला नाहीं. तसा कोणी आला, तर त्याला बसावयास त्यानें आपल्या दुकानांत जागाहि ठेवलेली नाहीं.

तो धर्मानें मूर्तिपूजेचा कट्टा द्वेष्टा आहे. पण हिन्दूंच्या देव-देवतांच्या फोटोंना सुंदर चौकटी बसवून त्याबद्दल मिळणारा भरपूर मोबदला मात्र तो सोडीत नाहीं. त्याला पूर्ण खात्री आहे कीं, त्यांतलेच चार आणे एखाद्या मवाल्याच्या हातावर फेकल्यास तो दोनचार हिन्दूंची टाळकीं फोडील म्हणून. त्यांच्या दुकानांत देवांबरोबर देशभक्तांचीहि गर्दी झालेली आहे. उद्यां चौकट बसविल्यानंतर मोठमोठ्या दिवाणखान्यां-तून ते विराजमान होतील, आणि त्यांच्याकडे पाहून लोक आदरानें माना लववितील; पण ते देशभक्त आज त्याच्या पायाशीं लोळण घेत आहेत. दिवसाला पन्नास देशभक्त त्याच्या हातांतून जात असले, तरी तो देशाबद्दल प्रीति बाळगीत

नाहीं, किंवा त्याबद्दल विचारहि करीत नाहीं. स्वस्त मिळणारा विदेशी कपडाच तो वापरतो. तुमच्या देशभक्तीचा मात्र तो आपले खिसे भरण्याकडे पुरेपूर उपयोग करून घेईल. आणि तुमच्या वेडेपणाकडे पाहून मनांतल्या मनांत हंसत राहील.

तुम्ही आपआपसांत भांडा, मारामाऱ्या करा; तो दूर राहून नुसती गंमत पाहील; असूयेनें प्रेरित होऊन एखादा नवीन देशभक्त उत्पन्न झाला, तर त्याचीहि प्रतिमा तो तितक्याच तत्परतेनें आणि निर्विकारपणें फ्रेम करून देईल. काम करतांना त्याला तें चित्र दिसत नाहीं. पैसे मिळविण्यास उपयोगीं पडणारा कागदाचा एक तुकडा, ह्यापलीकडे तो तुमच्या देवाच्या किंवा देशभक्ताच्या चित्राला जास्त किंमत देत नाहीं.

सकाळीं तो आपल्या दुकानांत फार लवकर येतो, आणि खालीं मान घालून कामास सुरवात करतो. कोणी गिऱ्हाईक आल्यास त्याच्याशींच बोलतो; बाजारगप्पांचा त्यास कंटाळा आहे. त्यानें आपल्या गिऱ्हाइकांना कधीं चहा पाजलेला नाहीं. मिठास वाणीमुळें त्याची त्याला जरूरच पडत नाहीं. मधलीं दोनचार हिन्दू हॉटेलें सोडून रस्त्याच्या कोपऱ्यावरच्या इराण्याच्या हॉटेलांतून दिवसांतून दोन वेळेला चहाची आर्डर मात्र तो स्वतःसाठीं देतो. अंधार पडल्यावर सर्व काम आटोपून तो उद्योग, चिकाटी आणि व्यवहारज्ञान यांचा पुतळा घाई घाईनें घरीं जातो, आणि दार ठोठावतो. आपल्या पिवळट तोंडावरून पडदा ओढलेली एक तरुणी येऊन दार उघडते. तिची इजार, जाकीट आणि ओढणी वगैरे सर्व

पोषाख तांबड्या-निळ्या रंगाच्या उंची रेशमाचा आहे; आणि घरांतील विजेच्या दिव्याच्या प्रकाशांत तो फारच खुलून दिसतो आहे. तिच्या त्या भारी पोषाखाकडे पाहून तुमचें मन त्या दोघांच्या पतिपत्नीत्वाच्या नात्याविषयीं साशंक होईल; पण तुम्ही ह्याबद्दल विचार करीत आहांत, तोंच तो आंत जाऊन धाडकन् दार लावील, आणि खीळ घालून पक्का बंदोबस्त करील. त्याच्या घराचें अंतरंग म्हणजे बुरख्या आड असलेल्या त्या तरुणीच्या चेहऱ्याप्रमाणेंच तुम्हाला कधींहि न उकलणारें एक गूढच राहील.

## ढग : : ५

सूर्याच्या पोटीं शनि जन्माला आला ! धृतराष्ट्राच्या पोटीं दुर्योधन अवतरला. पुराणें आणि इतिहास ह्यांचीं पानें चाळून पाहिलीं असतां, प्रसिद्ध आणि सदाचारी पुरुषांच्या पोटीं नालायक किंवा दुष्ट पुत्रच जन्माला आल्याचें बहुधा दिसून येईल. ह्याच्या उलट देवद्वेष्ट्या हिरण्यकश्यपूच्या पोटीं भक्त प्रल्हाद जन्माला आला. परंतु अशीं दुष्ट बापाच्या पोटीं सुपुत्र जन्मल्याचीं उदाहरणें फारच थोडीं सांपडतील. ढगाचें उदाहरण हें त्यांतीलच एक होय. महासागराचा तो पुत्र ! परंतु बापाच्या खारटपणाचा त्याच्यांत अंशहि नाहीं. उलट आपल्या गोडपणानें तो सर्व जगाला प्रियच झालेला आहे !

उन्हाळ्यांतील प्रखर सूर्यकिरणांनीं महासागराच्या अवाढव्य देहाची लाहीलाही होऊं लागते. वाफेच्या रूपानें जणूं काय त्याच्या अंगांतून घर्मबिंदूच निघूं लागतात. ते अंतराळांत जाऊन जमल्यावर त्यांपासून ढगाचा जन्म होतो. श्रीहनुमाना-

च्या घामापासून निर्माण झालेल्या मकरध्वजाचा पुराणांतरीं उल्लेख आहे, तसाच हा ढगहि महासागराच्या घामापासूनच उत्पन्न झालेला त्याचा पुत्र आहे. जन्मास येतांक्षणींच, आपल्या पित्याच्या शरीरावर स्वतःच्या देहाचें आच्छादन घालून, सहस्ररश्मीच्या चंड किरणांपासून तो त्याचें संरक्षण करतो, आणि आपल्या पितृॠणाची तो अंशतः फेड करतो.

माणसाच्या पोटांत भुकेची आग पेटलेली असते. मदिरेंतहि अग्नि असतो म्हणून म्हणतात. तें खरें आहे कीं नाहीं कोणास ठाऊक ! परंतु मदिराक्षीच्या डोळ्यांत मात्र बिजलीची चमक असते. ढगाचा पिता जो महासागर, त्याच्याहि वरून शांत दिसणाऱ्या जलाच्या पृष्ठभागाखालीं, वडवानल पेटलेला असतो, अशी कविकल्पना आहे. त्याचाच अर्क विद्युल्लतेच्या रूपानें त्याच्या पुत्राच्या पोटांतहि उतरला असल्यास नवल तें काय ?

महासागराचा हा पुत्र आकारानेंहि आपल्या पित्याला साजेसाच आहे. तो बहिरंगानें काळा असला, तरी त्याच्या हृदयांत दयेची आर्द्रता खूपच आहे. औदार्यांत तर त्याच्याशीं कोणाचीच तुलना करतां यावयाची नाहीं. बालसुलभ खेळकरपणानें तो नाचूंबागडूं लागतो. लवकरच वायूच्या रथावर आरूढ होऊन तो देशाटनास निघतो; परंतु प्रवासास निघण्यापूर्वी भावी पितृवियोगाच्या कल्पनेमुळें तो थोडेसे अश्रु ढाळतो. त्याचा पिताहि ते आपल्या शिंपल्यांच्या पेट्यांत मोठ्या प्रेमानें जपून ठेवतो. दूरदेशीं जाणाऱ्या त्या आपल्या

पुत्राच्या अश्रूंची किंमत त्याला उंची टपोऱ्या मोत्यांइतकी वाटते !

ढगाचें देशाटन चालू असतां, पहिल्यानें तो आपल्या आजोळीं येऊन पोहोंचतो. तेथें तो थोडे दिवस मुक्काम करतो. सह्यराजा आईकडून त्याचा आजोबा लागतो. नदी ही सागराची पत्नीच होय. महासागरानें एखाद्या ऐषआरामी बादशहाप्रमाणें ह्या नद्यांचा एक मोठा झनानखानाच बाळगलेला आहे. आणि ह्या त्याच्या राण्यांपैकीं बहुतेकांचा पिता सह्यराजाच आहे. ह्या आजोबांना आतां वार्धक्य आलेलें असल्यामुळें ते ईश्वरचिंतनांत निमग्न असतात. आपल्या हाडकुळया शरीरावरून एक हिरवी शाल ते पांघरून घेतात, व आपला सर्व काल परमार्थसाधनांतच व्यतीत करतात. पण ढग हा त्यांचा लाडका नातू असल्यामुळें तो अल्लडपणानें त्यांच्या अंगाखांद्यावर बागडतो. बालिशपणानें तो नानातऱ्हांचीं रूपें धारण करतो; केव्हां केव्हां एखाद्या असंख्य सोनेरी मेंढयांच्या कळपाचें स्वरूप धारण करून तो आजोबांच्या अंगावरील केस कुरतडल्यासारखें भासवितो, तर कधीं कधीं एखाद्या अवाढव्य राक्षसाचें रूप घेऊन तो आपल्या ध्यानस्थ आजोबांना भेडसावूं पाहतो ! त्याचे गंभीर आजोबा आपल्या नातवाच्या ह्या बालीश लीला मोठया कौतुकानें पाहतात. अशा रीतीनें थोडा काल आजोबांच्या खोडया काढून झाल्यावर त्यांचा निरोप घेऊन तो घाईघाईनें आपला पुढला मार्ग आक्रमण करण्यास सुरवात करतो.

कोणाला भेटण्याची त्याला उत्सुकता लागलेली आहे ? त्याची कोणी प्रिया आतुरतेनें त्याची वाट पहात बसली आहे काय ?

आपल्या प्रियेची भेट घेण्याच्या आनंददायी कल्पनेनें आणि तारुण्यसुलभ उच्छृंखलपणानें गर्जना करीत तो आपला प्रवास चालू करतो. मार्गानें गिरिकंदरांतून त्या भव्य गर्जनांचें पडसाद उठूं लागतात. त्यामुळें निद्रेतून दचकून जागा झालेला मृगेंद्र आपल्या गुहेंतून बाहेर पडतो, आणि आपली शेपटी फडकावीत त्यांना प्रत्युत्तर देण्याचा प्रयत्न करतो. परंतु आपल्या प्रियेच्या दर्शनासाठीं उत्सुक झालेला मेघराजा त्याच्याकडे पाहून एकदा तुच्छतेनें खदखदा हंसतो मात्र ! त्यावेळीं त्याची ती शुभ्र दंतावली लकाकून जाते. मृगेंद्राचे डोळे त्यामुळें दिपून जातात. त्याच्याकडे पूर्ण दुर्लक्ष करून, मेघराजाचा प्रवास आकाशमार्गानें झपाट्यानें चालूच असतो !

वसंतऋतूचा नयनमनोहर साज चढवून भूमिदेवता मेघराजाच्या स्वागतार्थ सज्ज राहिलेली असते. नाना रंगांच्या पुष्पभारानें तिनें आपणाला माळवून घेतलेलें असतें. तिनें अंगाला लावलेल्या निरनिराळ्या सुवासिक अत्तरांच्या आल्हाददायक सौरभानें सर्व वातावरण भरून गेलेलें असतें. तिच्या पायांतील नुपूरांचा चेतोहारि रुमझुम् नाद सर्व विश्वाला मोहिनी घालीत आहे. आपला प्रियकर जो मेघराजा त्याच्या चिरवियोगामुळें मात्र तिच्या अंगाचा दाह झालेला आहे. विरहाग्नीनें ती होरपळून निघालेली आहे. आणि म्हणून मयूराच्या पूर्ण विस्तारलेल्या पिसाऱ्यांच्या पंख्यांनीं वारा

घेत आतुरतेनें मेघराजाच्या वाटेकडे डोळे लावून ती बसलेली आहे.

अखेरीस ज्याच्या दर्शनासाठीं ती इतकी उत्सुक झालेली असते, व ज्याची मार्गप्रतिक्षा ती इतकी नटूनथटून करीत असते, तो मेघराज तिला दिसूं लागतो. प्रातःकालीं सुवर्णमुकुट चढवून तो आपलें डोकें हळूहळू क्षितीजाच्या कडेवर काढतो. भर उन्हाचें त्यानें आपल्या अंगाभोंवतीं रुपेरी कडें चढविलेलें असतें, तर रात्रीच्या शांत वेळीं तो पिंजलेल्या कापसाच्या ढिगांप्रमाणें दिसूं लागून, जणूं काय सुधांशूच्या शीतल किरणांपासून आपल्या प्रियेचें निवारण करीत आहे, असा भास होतो. त्याच्या आगमनाच्या सन्मानार्थ वाजविलेल्या मयूरांच्या केकांच्या तुताऱ्यांनीं वातावरण निनादित होतें. दोघांची दृष्टादृष्ट होते. दोघेहि एकमेकाला डोळे भरून पाहून घेतात. परंतु त्यांच्यांतील अंतर मात्र कमी होत नाहीं. प्रियेची कडकडून भेट घेण्याची मेघराजाला प्रबळ इच्छा असूनहि, ती सफल होत नाहीं. दृष्टीसमोर त्याची हृदयस्वामिनी दिसत असूनहि त्याला केवळ दृष्टिसुखावर संतुष्ट राहाणें भाग पडतें. चक्रवाकांच्या विरहावस्थेचा अनुभव त्यांना येतो. प्रियेच्या स्पर्शसुखासाठीं मेघराज आटोकाट धडपड करण्यास सुरवात करतो.

मेघराजाच्या हृदयांत प्रेमाची ज्योत संतत पेटलेली आहे. मधून मधून प्रेमाचा आवेग त्याला अनावर होतो. त्याच्या प्रेमाची उत्कटता हृदयाच्या मर्यादा ओलांडून ओथंबूं लागते.

एकच कडकडाट होतो. आसमंतांतील प्रदेश प्रकाशमान करीत त्याच्या हृदयांतील प्रेमज्योति भूमिदेवतेच्या हृदयाचा ठाव घेण्यासाठीं निघते. त्या वेळचा त्याच्या हृदयांतील भावनांचा गडगडाट ऐकून आणि प्रेमज्योतीची दैदिप्यता पाहून, क्षणकाल सर्व चराचर विश्वाचे डोळे दिपून जातात. त्यांच्या हृदयांचें मीलन होतें. परंतु त्यांच्यांतलें अंतर मात्र कमी होत नाहीं. मेघराजा तर मीलनासाठीं अधीर झालेला असतो. त्याला तो विरह अधिक काल सहन होत नाहीं. आपले सर्व प्रयत्न फुकट गेलेले पाहून तो क्रोधायमान् होतो. आपल्या वायूच्या रथाला तो सैरावैरा सोडतो, आणि एकच धुमाकूळ मांडतो. त्या वेळच्या त्याच्या भयानक आरोळ्या ऐकून, त्याच्या डोळयांतून बाहेर पडत असलेलीं अग्नि-स्फुलिंगें पाहून, प्रलयकाल जवळ आल्यासारखा भासूं लागतो, आणि साऱ्या ब्रह्मांडाचा थरकांप उडतो.

मेघराजानें क्रुद्ध होऊन आकाशपातळ एक केलें, तरी त्याचे हेहि प्रयत्न फुकट जातात. त्याची मनीषा पूर्ण होत नाहीं. त्याचा दारुण प्रेमभंग होतो. दुःखाचा भार सहन न होऊन, त्याच्या डोळयांतून अश्रुधारा वाहूं लागतात.

त्याच्या स्पर्शासाठीं हपापलेल्या भूमीचें शरीर त्या अश्रूंच्या स्पर्शानेंहि रोमांचपुलकित होतें. तिच्या मनांत भावनांचा एकच खळखळाट उडतो. पण तिचें हृदय मात्र आपल्या प्रियकराची स्थिति पाहून विरघळून जातें.

दुर्दैवी मेघराजाच्या डोळ्यांतून सारख्या अश्रुधारा वाहूं लागतात. प्रेमभंगाच्या हृद्रोगामुळें त्याची अंगकांति फिकट होऊं लागते. तो कृश होऊं लागून त्याचें वजन कमी होऊं लागतें. त्याची गर्जना करण्याची शक्ति हळूहळू नष्ट होते. त्याच्या डोळ्यांतील तेज नाहींसें झालेलें असतें.

त्यानें मोठ्या प्रेमानें अर्पण केलेला हिरवा शालू भूमि परिधान करते. तिच्याकडे तो एकदा डोळे भरून पाहून घेतो. हा प्रियेला भेटण्यासाठीं मोठ्या उमेदीनें आलेला मेघराजा, प्रेमभंग झाल्यामुळें विरक्त बनूं लागतो, आणि अखेरीस उरलेसुरले अश्रु ढाळीत संन्यास घेण्यासाठीं तो हिमालयाच्या निबिड अरण्याचा मार्ग धरतो !

# मृत्युलेख कसा लिहावा? : : ५

प्रेमाच्या कविता, आगगाड्या, बाटलाबाई, सोडालेमन, तारायंत्र, आम्लेट वगैरे वगैरे ज्या बऱ्यावाईट गोष्टी आपण पाश्चात्यांपासून उचलल्या आहेत, त्यांतच 'मृत्युलेख' लिहिण्याच्या कलेचाहि अंतर्भाव केला पाहिजे. पाश्चात्यांच्या चालीरीतीच अशा आहेत कीं, मृत्युलेख लिहिण्याची कल्पना त्यांना सुचावी. आणि म्हणूनच आज फार पुरातन कालापासून ते मृत्युलेख लिहून ठेवीत आले आहेत. मृताला ते थडग्यांत पुरतात आणि त्या थडग्यावर मृत्युलेख कोरून ठेवण्यास त्यांना जागाहि भरपूर असते. साहजिकच ही कल्पना त्यांच्या डोक्यांत आली. आपली परिस्थिति मात्र अगदींच भिन्न आहे. मृताला जाळून टाकून आपण त्याचा मागमूससुद्धां राहू देत नाहीं. परंतु आतां मृत्युलेखाची प्रथा पडत चालल्यामुळें एखाद्या मृत व्यक्तीबरोबरच त्याच्या आठवणीहि जोचीराख होण्याची भीति नाहींशी झाली आहे.

ह्यावरून मृत्युलेखाला आपल्याकडे किती महत्त्व आहे ( किंवा असावयास पाहिजे ) हें स्पष्ट दिसून येतं. जन्माला आलेला मनुष्य एक दिवस मरणारच, ह्या नियमानुसार जोंपर्यंत ही सृष्टि चाललेली आहे, तोंपर्यंत तर मृत्युलेखाचें महत्त्व वाढतच जाणार. मृताबद्दलच्या आपल्या भावना व्यक्त करण्यास मृत्युलेखासारखें उपयुक्त साधन दुसरें क्वचितच असेल. म्हणून मृत्युलेख लिहिण्याच्या कलेवर हा लेख लिहून, मी एका महत्त्वाच्या विषयाला चालना देत आहें, असा मला आत्मविश्वास वाटत आहे.

मृत्युलेखाचे स्थूलमानानें दोन भाग पाडतां येतील. एक मोठ्या लोकांच्या मृत्युलेखांचा, व दुसरा छोट्या लोकांच्या मृत्युलेखांचा. ह्या दोन तऱ्हांचे मृत्युलेख लिहिण्याचे हेतुहि अगदींच भिन्न असतात. एखाद्या थोर विभूतीचा मृत्युलेख लिहिण्यांत लेखकाचा उद्देश, स्वतःला मोठेपणा मिळविण्याचा असतो; तर दुसऱ्या तऱ्हेचा म्हणजे एखाद्या छोट्या व्यक्तीचा मृत्युलेख लिहिण्यांत, त्या व्यक्तीला मरणोत्तर मोठेपणा देण्याचा हेतु असतो. पहिल्या प्रकारचे लेख लिहिणें त्या व्यक्तीच्या मोठेपणामुळें व कीर्तीमुळें फारच सोपें असतें, परंतु दुसऱ्या प्रकारचे लेख लिहिणें मात्र तितकेंच अवघड असतें. ती एक कलाच आहे. आणि प्रस्तुत लेखाचें उद्दिष्ट, त्या कलेच्या तंत्राचें दिग्दर्शन करणें, हेंच आहे.

मृत्युलेख लिहावयास बसण्यापूर्वी पुढील गोष्टींची तयारी करून ठेवावी :—

( १ ) ज्याचा मृत्युलेख लिहावयाचा असेल त्याचा मृत्यु.
( २ ) दऊत, टांक, व कागद.
( ३ ) उल्हसित मनोवृत्ति.
( ४ ) संस्कृत व इंग्रजीचें तुटपुंजें ज्ञान.
( ५ ) विडीचें एक बंडल व काड्यांची पेटी.
( ६ ) कांहीं शेलक्या सभ्य शिव्या आणि
( ७ ) तंत्राचा अभ्यास.

ह्या सूत्रसप्तकांतील ( वाचकहो, जाडे शब्द वापरल्याबद्दल क्षमा करा, पण भारदस्त लेखनांत प्रौढ शब्द न वापरून कसें चालेल ? ) पहिली गोष्ट तेवढी दैवाधीन आहे. बाकीच्या सर्व मानवाला प्रयत्नसाध्य आहेत. ह्यांतील तिसरें कलम मात्र फारच महत्त्वाचें आहे. मृत्युलेख लिहितांना तो लेखकानें आनंदी मनःस्थितींत असतांना लिहावा, हें वाक्य ' वदतो व्याघाता 'चें उदाहरण असल्याचा कांहीं वाचकांना भास होईल. परंतु कोठलाहि लेख सरस वठवायचा असेल तर लेखकाची मनोवृत्ति खिन्न असून चालावयाचें नाहीं. तीच गोष्ट मृत्युलेखासंबंधीहि. मृत्युलेख जर चटकदार वठवावयाचा असेल तर लेखकाची मनःस्थिति जितकी जास्त आनंदी असेल तितकें चांगलें. अधिकस्य अधिकं फलम् ! बाकीची सामुग्री जमविणें तेवढेंसें अवघड नाहीं. तेव्हां, टेबलखुर्चीवर जाऊन सस्मित वदनानें लेख लिहावयास बसावें. मृत व्यक्ति जर आपल्या नात्यांतलीच असेल, आणि जर तिनें मृत्युपत्रांत

आपल्याला कांहीं वांटा ठेवलेला असेल, तर मनःस्थिति साहाजिकच आनंदांत असते. आपल्या वांट्याच्या लहानमोठेपणावर लेखाची लांबीरुंदी ठरवावी. तसें नसल्यास आपल्यास साधण्यासारखा दुसरा एखादा उपाय शोधून काढावा. लेखाचे मुख्यतः पुढीलप्रमाणें भाग पाडावेत:—

१ जन्मकाल व घराणें—आपल्या चरित्र नायकाचें घराणें बहुधा अप्रसिद्ध आणि गरीब असतें. नाहींतर आपण लेख लिहावयास घेतलाच नसता व तेंच चांगलें. त्याचा उल्लेख असा करावा:—

" ह्यांचा जन्म XX ह्या बाळबोध वळणाच्या घराण्यांत झाला. घरची स्थिति साधारण गरिबीचीच असल्यामुळें, अंग मोडून काम करण्याचा गुण लहानपणापासूनच ह्यांच्या अंगवळणीं पडला होता. " वगैरे. जन्म खेड्यांत आणि गरीब कुटुंबांत झालेला असल्यास वाचकाचें नायकाविषयीं मुळापासूनच चांगलें मत होतें. त्याचा कोणी काका, मामा, काकेमामा, मामेकाका वगैरे पुण्यामुंबईकडे येऊन प्रसिद्धीला आलेला असल्यास त्याचाहि उल्लेख अवश्य करावा.

२ बालपण व शिक्षण—नायकाचें बालपण जितकें खेड्या-पाड्यांतून गेलेलें असेल तेवढें चांगलें. तेथें त्यानें पेरू चोरून खाणें, बोरें पाडणें वगैरे उद्योग केलेले असल्यास फारच चांगलें. त्याचा उल्लेख साधारणपणें पुढीलप्रमाणें करावा :

" मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात, त्याप्रमाणेंच आमच्या नायकाचा धाडसी स्वभाव त्याच्या बाललीलांतूनहि दिसून

येत होता. त्यांचा स्वभाव बराच हूड होता..." शिवाजी-महाराज, क्लाइव्ह, वगैरे महापुरुष लहानपणीं हूडच होते. त्यांचें पाठबळ आपणाला असतें. येथें नायकाला फायदेशीर अशा त्याच्या बालपणांतल्या एकदोन खऱ्याखोट्या गोष्टीहि ठोकून द्याव्यात ! कारण त्यांची इतका काळ आठवण असणें कोणालाहि शक्य नसतें. शिवाय नायकाच्या बाललीला पाहिलेले वृद्ध लोक, हा वेळ पावेतों परलोकांत नायकाचें स्वागत करावयाला जाऊन बसलेले असतील ! तेव्हां आपण निर्धास्त असावें.

३ शिक्षणक्रम—आपल्या नायकाचा शिक्षणक्रम बहुधा समाधानकारक नसतो. तो दरवर्षी परीक्षकांच्या कचाट्यांतून कसाबसा सुटत असला, तर त्याचा उल्लेख 'हुशार', 'बुद्धिमान्' असा बेलाशक करावा. परीक्षांत टक्केटोणपे खाऊन चरित्रनायक तावून सुलाखून निघालेला असल्यास, साहजिकच त्याला चांगलीशी नोकरी न मिळाल्यामुळें, एखाद दुकान थाटावें लागतें. तें असें सांगावें: "ह्यांचा कल लहानपणापासूनच व्यापाराकडे होता, त्यामुळें त्यांचें अभ्यासाकडे विशेष लक्ष नव्हतें." त्याचबरोबर आपल्याकडील शिक्षणपद्धतीला दोन-चार शिव्याहि द्याव्यात.

४ धंदा व यशापयश—आपला चरित्रनायक वकील, डॉक्टर, कारकून किंवा व्यापारी ह्यांपैकींच कोणी तरी असणार. वकीलींत त्यानें पोटापाण्याची तरतूद होण्याइतकें जर यश मिळविलेलें असेल, तर त्याचा साहजिकच

"हुशार, प्रतिपक्षाचे डावपेंच ओळखणारा" असा उल्लेख करावा लागतो. त्याची वकिली चाललेली नसल्यास, तो बहुधा देशभक्ति करावयास लागतो. मग देशभक्तीवर एक लहानसें व्याख्यान द्यावें. सर्व दुकानदारांना 'स्वातंत्र्य-प्रियतेचें' पीस चिकटवून द्यावें. त्याला दुकानावर पैसा मिळाला असल्यास त्याच्या कर्तबगारीबद्दल त्याची पाठ थोपटावी. तोटा झालेला असल्यास, "केवळ आपल्या गांवच्या विद्यार्थ्यांस स्वस्त किंमतींत पुस्तकें घेतां यावींत म्हणून त्यांनीं तोट्याची झळ लागत असतांनाहि, आपलें पुस्तकांचें (सेकंड हँड) दुकान नेटानें चालविलें होतें..." अशा तऱ्हेची शब्दयोजना करावी.

५ गुणवर्णन— 'आला आला प्राणि जन्मासि आला, आणि पाणी वाहुनी मेला' अशी स्थिती ज्या नायकाची असेल, ज्यानें उभ्या जन्मांत लोकांच्या लक्षांत येण्याजोगें एकहि सत्कृत्य केलेलें नसेल, त्याच्या मृत्युलेखांत ह्याच सदरा-वर भर द्यावा लागतो. हें सांगणें जरा विचित्र दिसतें खरें, पण त्याशिवाय गत्यंतरच नाहीं. "स्वच्छता, टापटीप, हिशोबी-पणा, मनमिळाऊ स्वभाव," वगैरे गुण कोणालाहि चिकट-वितां येतात. उदाहरणार्थ, एखाद्या कारकुनाविषयीं पुढील-प्रमाणें लिहावें: "ह्यांचा नियमितपणा वाखाणण्यासारखा होता. ऑफिसांत वेळेवर पोहोंचण्यासाठीं ते धड जेवतसुद्धां नसत. जेव्हांचें काम तेव्हांच उरकण्याबद्दल त्यांचा विशेष कटाक्ष असे, तो खरोखर कौतुकास्पद होता. घरीं जाण्याची वेळ

टळून गेली, तरी कित्येकदां ते ऑफिसांत काम करीत बसलेले पाहावयास मिळत. ( साहेबाचा धाक नसता, तर ते तासभर उशीरां जाऊन दोन तास आधीं निघाले असते ! ) त्यांची सचोटी ( खर्डेघाशीखेरीज ऑफीसांत इतर कामच त्यांच्याकडे न आल्यामुळें त्यांची ह्या गुणाची कसोटी पाहण्याचा प्रसंगच झाला नव्हता ! ) आदर्शनीय होती..." इत्यादि. कंसांतलीं वाक्यें आपण मनांतच उच्चारावयाचीं असतात. तीं केव्हांहि लेखांत लिहावयाचीं नाहींत. त्याचप्रमाणें नायकाचे दुर्गुणहि गुलदस्तांतच ठेवावयाचे असतात. साधल्यास त्यांस सद्‌गुणांचा पोषाख चढवावा. उदा० तिरसटपणास सडेतोडपणा, उधळेपणास दिलदारपणा, लबाडीस मुत्सद्दीपणा, वगैरे.

आपला चरित्रनायक जिवंत असतांना आपलें त्याच्याशीं वैर असल्यास त्याचा उल्लेख मुद्दाम करावा. आणि असें असूनहि 'आम्ही त्यांच्यांत अमुक अमुक गुण होते, हें प्रांजलपणें कबूल करतों,' असें असंदिग्ध भाषेत लिहावें. म्हणजे वाचकांचें आपल्याविषयीं चांगलें मत होतें. नायक जिवंत असतांना त्याला जितक्या शिव्या दिल्या असतील, त्याच्या दुप्पट स्तुति आतां बेलाशक करावी. कारण आतां ती त्याला ऐकूं जाण्याची मुळींच भीति नाहीं.

६ मृत्यु, शिवीगाळी, सुभाषितें—मृत्यूचा प्रसंग जितका हृदयस्पर्शी रंगवितां येईल तेवढा रंगवावा. ही गोष्ट नेहमीं संस्कृतप्रचुर भाषेतच सांगितली पाहिजे. 'दिवंगत झाले,' 'निज-

धामाप्रत गेले, ' ' इहलोकची यात्रा संपविली, ' ' कैलासवासी झाले, ' वगैरे शब्दप्रयोग शिष्टसंमत आहेत.

ज्या कालानें आपल्या नायकासारखे मोहरे घशांत घातले, त्याला ' निर्घृण, ' ' दुष्ट, ' ' कठोर, ' ' सर्वभक्षक ' वगैरे शेलक्या सभ्य शिव्या देऊन आपली शिवीगाळीची हौस भागवून घ्यावी. शिव्या देतांना मुळींच मागेंपुढें पाहूं नये, कारण, कालाला शिव्या दिलेल्या सर्वांना आवडतात.

एखादें पिकलेलें पान गळून पडलेलें असल्यास एक वृद्ध, अनुभवी, विद्वान् मार्गदर्शक नाहींसा झाला म्हणून शोक करावा. लेखकाच्या दृष्टीनें नायकानें तारुण्यांत मरण्यासारखी चांगली गोष्ट कोणतीच नाहीं. मग त्याला त्यावर भरपूर लिहितां येतें. Great men die early ( थोर विभूति अल्पायुषी असतात. ) किंवा परमेश्वराला चांगलीं माणसें आवडतात, म्हणून तो त्यांस आपल्याकडे लवकर घेऊन जातो, वगैरे पुष्ट्यांतलीं वचनें वाचकांच्या तोंडावर भिरकावून देतां येतात, व नायकालाहि मोठेपणाला चढावयास ( हाच आपला मुख्य उद्देश आहे ) प्रयास पडत नाहीं. प्रमेयावरून ( Theorem ) उपप्रमेय ( Corollary ) सिद्ध व्हावें तसाच त्याचा मोठेपणाहि आपोआप सिद्ध होतो. शिवाय ' हा हन्त हन्त ! नलिनीम् गजमुज्जहार ' असें म्हणून विलाप करावयासहि ही छान संधि असते. निवडक सुभाषितांचा उपयोग करण्याची ही योग्य जागा होय. किंवा तीं लेखाच्या प्रारंभीं दिलीं तरी शोभतात. ह्यांचा उपयोग समर्पकतेपेक्षां

आपल्या विद्वत्तेची वाचकांवर छाप पाडण्याकडेच अधिक होतो.

७ उपदेश व भरतवाक्यः—मृताच्या जिवंत असलेल्या सर्व आप्तेष्टांची खानेसुमारी देऊन, त्यांना " जग हें क्षणभंगुर आहे !" " आत्मा अविनाशी आहे !" वगैरे अनादि कालापासून चालत आलेल्या तत्त्वज्ञानाच्या उपदेशामृताचे दोन घुटके, आपणाकडे एखाद्या स्थितप्रज्ञाची भूमिका घेऊन पाजावेत. जमल्यास आपल्या मदतीला भगवंत, शंकराचार्य वगैरे मंडळीलाहि बोलवावें. नंतर त्यांच्यावर दुःखाचा जो पर्वत कोसळला आहे, त्याखालीं आपणहि सांपडलेलों आहोंत असा हवाला द्यावा व शेपूट तुटलेल्या कोल्ह्याप्रमाणें, त्यांना त्यांतच समाधान मानून घेण्याचा उपदेश करावा. फुकटचें दुःखप्रदर्शन करण्यांत आपल्या मनाचा मोठेपणा व सौजन्य मात्र दिसून येतें !

प्रत्येक लेखाचा शेवट 'ईश्वर मृताच्या आत्म्यास शांति देवो !' ह्या गंभीर भरतवाक्यानें करावा. एखाद्या वेळीं हें वाक्य विसरलें गेलें तरी हरकत नाहीं. कंपॉझिटर तें अचूक ठेऊन देईल.

आपला चरित्रनायक जिवंत असतांना त्याला स्वतःला किंवा त्याच्या आप्तेष्टांना कल्पनाहि नसेल एवढ्या मोठेपणाचा मृत्युलेखानें त्याला धनी बनवितां आलें पाहिजे. आपण एका मोठ्या व्यक्तीच्या सहवासांत दिवस काढीत होतों, आणि त्याची आपणाला जाणीवहि नव्हती, असें वाटून त्याच्या आप्तेष्टांना

आश्चर्ययुक्त हळहळ वाटली पाहिजे. येवढेंच काय, पण आपलाहि मृत्यूलेख किती सुंदर वठतो, हें पाहण्यांकरतां त्यांना मरावेंसें वाटूं लागलें पाहिजे. तरच मृत्युलेख यशस्वी झाला असें म्हणतां येईल.

हें झालें मृत्युलेख लिहिण्याच्या तंत्राबद्दल. आतां त्यापासून लेखकाला होणाऱ्या फायद्यांकडे वळूं.

१ लेखकानें कितीहि घोडचुका केल्या, तरी प्रसंगच इतका गंभीर व दुःखमय असतो, कीं त्याकडे वाचकांना दुर्लक्ष करणें भाग पडतें.

२ लेख छापून येण्याला फारशी अडचण पडत नाहीं. कोणीहि संपादक एखाद्या गचाळ गोष्टीपेक्षां—आणि प्रसिद्धीसाठीं आलेल्या बहुतेक गोष्टी अशाच असतात—केव्हांहि मृत्युलेखच पसंत करील.

३ आपल्या लेखाला काळ्या चौकटींत बसण्याचें वैशिष्ट्य व भाग्य मिळतें.

४ विनोद, गंभीर, शांत, करुण वगैरे सर्व रसांत डुबक्या मारायला लेखणीला भरपूर वाव असतो.

५ तुम्ही मृत्युलेख लिहिणारे आहांत, ही बातमी एकदा गांवांत पसरली, कीं तुमचा एक प्रकारचा वचक राहील. ‘ मरावें परी कीर्तिरूपें उरावें ’ ही श्रीसमर्थांची शिकवण लहान वयापासूनच सर्वांच्या मनावर बिंबवली गेली असल्यामुळें, म्हातारेकोतारे तुमच्याशीं दोस्ती करून, तुम्हांला खूष ठेवण्यासाठीं धडपड करतील.

विशेषतः नवशिक्या लेखकानें तरी मृत्युलेख लिहिण्यापासूनच वाङ्मयप्रांतांतील मुलुखगिरीला सुरवात करावी. त्यानें कोठें एखादी संधि मिळते का ह्याची वाट पाहत नेहमी टपून बसलेलें असावें. डॉक्टरांच्या कृपेमुळें अशा संध्या त्याला वारंवार मिळणार असल्यामुळें त्यानें त्यांचें ऋणी असावें. एकदां दहा बारा मृत्युलेख लिहून लेखणी लेखनाला सरावली, म्हणजे लेखनाच्या इतर क्षेत्रांत धुडगूस घालावयास सुरवात करावी व अशा रीतीनें सरस्वतीच्या उपासकांच्या प्रभावळींत स्वतःचें आसन ठोकून द्यावें.

६ एखाद्या थोर पुरुषाच्या मृत्युलेखांत आपल्या एकदोन आठवणी दडपून द्याव्यात. त्या वेळीं त्याचा उल्लेख घरांतल्या नांवानें करावा. (उदाहरणार्थ तात्यासाहेब, काकासाहेब, वामनरावजी वगैरे) आपल्याबद्दल त्यानें काढलेले कांहींसे खरे किंवा काल्पनिक प्रशंसोद्गारहि द्यावेत. ह्यावरून आपण कोणी तरी मोठे आहोंत असा वाचकांचा ग्रह होतो.

असे दोनतीन थोर विभूतींचे मृत्युलेख लिहिले, तर लेखकहि मोठ्या माणसांच्या पंक्तींत जाऊन बसतो !

आणि मग एक दिवस त्याचाहि मृत्युलेख येतो, त्याबद्दल त्यानें निर्धास्त असावें !

## झोंप : : ७

कोणत्याहि प्राण्याच्या जीवनाला ज्या गोष्टी अत्यंत आवश्यक आहेत, त्यांत अन्न, वायु व झोंप ह्या मुख्य होत. अन्न खाल्ल्यावांचून मनुष्य जगूं शकणार नाहीं. अतिशय भूक लागली असतां, मनुष्य वाटेल तें खाईल. म्हणतात ना, 'भुकेला कोंडा!' विषमज्वराच्या कित्येक रोग्यांची भूक अनावर झाल्यामुळें, त्यांनीं दवाखान्यांतील गाद्यांचा काथ्या ओरबडून खाल्ल्याचीं उदाहरणें प्रसिद्ध आहेत. ही गोष्ट जशी अन्नाची, तशीच हवेची. हवा जर थोडा वेळ बंद झाली, तर सर्व जग अचेतन होईल, हें हवेंत उडणारे अति उंच म्हणजे बिनहवेच्या प्रदेशांत गेल्यावर त्यांची जी 'हवा' झाली त्यावरून दिसून येतें. इन्द्राच्या वज्रानें आपल्या प्रिय पुत्राला मूर्छा आलेली पाहून, वायुदेवानें आपला कारभार बंद ठेवून सर्व विश्वाचा कारभार आटोपण्याची देवादिकांना घातलेली धमकी तर पुराणांतून प्रसिद्धच आहे.

ह्यावरून मनुष्याच्या जीवनाला अन्न व वायु ह्यांची अत्यंत जरूरी आहे हें दिसून येतें. पण ह्या गोष्टींची त्याला जितकी आवश्यकता आहे, तितकीच-किंबहुना अधिकच-झोंपेचीहि आहे. सुधारलेल्या राष्ट्रांतून कैद्यांना जबर शिक्षा म्हणून झोंप न येऊं देण्याची व्यवस्था देखील केलेली दिसून येते. अर्थात् त्यांना झोंपेची महति कळलेली आहे, हेंच दिसून येतें. हें जरी सोडून दिलें तरी झोंपेसारखी इमानी मैत्रीण मनुष्याला दुसरी कोणतीच नाहीं. पैशासारखा मित्र नाहीं असें आपण समजतों; परंतु लांब देठाच्या कमलावर विराजमान झालेली ही लक्ष्मी प्रतिकूल दैवाच्या झुळुकीनें सुद्धां पाण्यांत केव्हां गडप होईल ह्याचा नेम नसतो. परंतु झोंप मात्र आपणाला शेवटपर्यंत सोबत असते. तसेंच अन्न व वायु, कीं ज्यांच्यावांचून आपलें पदोपदीं नडेल असें आपण समजतों, त्यांचा व आपला संबंध फक्त आपण जीवंत असेपर्यंतच चालतो; पण झोंप-कालनिद्रा-मात्र मृत्यूच्या अफाट व अज्ञात प्रदेशांतून प्रवास करतांना सुद्धां आपणांस कधींहि विसंबत नाहीं !

झोंपेचा मोठेपणाच सिद्ध करावयाचा झाल्यास आणखी पुष्कळ विधानें पुढें करतां येण्याजोगी आहेत. वरील त्रयींत-अन्न, वायु व झोंप-झोंपच फक्त वाटेल तेव्हां आपल्या सेवेसी रुजू होण्यास तयार असते. त्याचप्रमाणें खावयास अन्न घेऊं म्हटलें तर पैसा टिचावा लागतो. आणि दिवसेंदिवस अन्न तर महागच होत आहे. ह्या अन्नाचा त्रास चुकविण्यासाठीं म्हणून कित्येक जण कालनिद्रेलाच शरण आले आहेत. तेंच

हवेबद्दलहि. हवेला पैसे पडत नाहींत असें आपण समजतों. पण जरा विचार केल्यावर ती आपली चूक आहे, असें आपणांस आढळून येईल. 'हवाशीर' बंगला घ्यावयाचा असल्यास लठ्ठ भाडें भरावें लागतें. हवा खावयाची असल्यास दोनचार मैल तंगडया तांगडत जावें लागतें. तसेंच ह्या 'हवा खाण्यांतहि' बरेच उच्चनीच प्रकार आहेत. 'उंची हवा' खावयाची असल्यास कमींत कमी दोन हजारांपासून पन्नास साठ हजारांच्या मोटारीपर्यंत किंमत वाढत जाते. किंवा निराळया अर्थानें जरी 'हवा खावयाची' असली तरी दोनचार रुपये एखाद्या फरारी कर्जबाजाऱ्यास द्यावे लागतात. तात्पर्य इतकेंच कीं, अन्न व हवा ह्यांचा उपभोग घेणें हें मध्यम स्थितींतल्या माणसाला सर्वथैव शक्य नसतें. पण झोंपेचें मात्र तसें नाहीं. झोंपेला काळवेळ लागत नाहीं, कीं तिला कांहीं खर्चहि येत नाहीं. उलट, एखाद्या गांवठी नाटकमंडळीच्या प्रयोगाला जाऊन झोंपमोड करावयाची असल्यास मात्र दंड म्हणून तिकिटाला पैसे भरावे लागतात. किंवा झोंप हांकलून लावण्यासाठीं म्हणून चहाच्या 'सिंगल'ला पैसे खर्च करावे लागतात. तसेंच अन्न खाऊन खाऊन नकोसें होईल, नुसती हवाच खाऊन माणूस हवेसारखा पातळ होईल, व त्याला तिचा कंटाळा येईल, पण झोंप मात्र कितीहि घेतली तरी आणखी घ्यावीशीच वाटते. हा साखरझोंपेबद्दलचा अनुभव तर थंडीच्या दिवसांत प्रत्येकाचाच आहे.

झोंपेचें श्रेष्ठत्व सिद्ध करावयास पुढील एकच विधान पुरेसें आहे. सर्व लोक धनाला प्रिय समजतात, व तें जपून ठेवतात. त्याची चोरी करणारा अधम ठरतो, व त्याला तुरुंगवास भोगावा लागतो. जितका अधिक पैसा चोरला असेल, तितका तो चोर अधिक नीच व अधिक शिक्षेस पात्र ठरतो. अशा चोरांनीं रात्रींच्या झोंपाच काढाव्यात अशी सर्वांची इच्छा असते. कारण धनिक जर त्यांच्याबद्दल बिनघोर राहिले, तरच त्यांना रात्रींचें सुखानें घोरतां येईल. परंतु जोंपर्यंत धनावांचून ह्या जगांत अडतेंच आहे, तोंपर्यंत त्याच्या चोऱ्या ह्या होणारच. व आप्पलपोटे श्रीमंत व इतर लोक चोरांना नीच, हलकट असें म्हणणारच. पण हाच चोरीचा संबंध झोंपेशीं आला तर? तर पाहा कशी यक्षिणीची कांडी फिरल्याप्रमाणें सर्व देखावा पार बदलून जातो!

चोर जरी नीच मानला जात असला, तरी झोंपेची चोरी करणारा चोर मात्र कौतुकास्पद व सर्वांचा आवडता होतो. रात्रभर झोंपेवांचून तळमळणाऱ्या प्रियेची निद्रा चोरणारा तिचा प्रियकर नीच मानला जात नाहीं. फार कशाला? त्याला बघून इतरांनाहि त्याच्यासारख्याच चोऱ्या कराव्याशा वाटतात. आणि तशी अनुकरणाची इच्छा उत्पन्न होण्यास आकर्षणेंहि तशींच दांडगीं असतात. एक तर ह्या चोरांना शिक्षा होण्याची मुळींच भीति नसते. कारण अशा चोराचें नांव घेण्याचीच मुळीं चोरीच्या मालाच्या मालकाला चोरी असते; आणि यदाकदाचित् कांहीं शिक्षा झालीच तर रमणीच्या कपोलांवर

संध्येचीं सुंदर चित्रें रंगविण्याचीच गोड शिक्षा होईल, अशी त्याला खात्री असते. अर्थात् चोरीला झोंपेचा परिस लागतांच चोराच्या आयुष्याचेंहि सोनेंच बनतें. झापेच्या सान्निध्यानें चोरीला देखील मोठेपणा प्राप्त होतो, पण तोच संबंध जर इतर पदार्थांशीं आला, तर चोरीला कमीपणा येतो. ह्यावरून झोंप इतर गोष्टींहून किती श्रेष्ठ आहे, हें दिसून येतें.

अन्न खावयास किंवा हवा खावयास काळवेळाकडे बघावें लागतें; पण झोंपेच्या बाबतींत मात्र तसें कांहीं नाहीं. माझ्या-सारख्या आपल्या एकनिष्ठ भक्तावर अनुग्रह करण्यास निद्रा-देवी सर्वथैव तयार असते. डोळे मिटून थोडा वेळ तिची प्रार्थना करण्याचा काय तो अवकाश, कीं देवी मला कुरवाळूं लागलीच. लोकमान्य टिळकांविषयींहि असेंच सांग-तात कीं, त्यांना वाटेल तेव्हां झोंप येत असे. त्यांच्याबद्दल अशी एक गोष्ट सांगतात कीं, त्यांना राजद्रोहाच्या आरोपा-वरून भयंकर शिक्षा झाली असतां आगगाडींतून जेलच्या गांवीं नेण्यांत येत होतें. गाडीचा रस्ता पंधरा एक मिनिटांचाच होता. इतर कांहीं करमणुकीचें साधन नसल्यामुळें म्हणा किंवा त्यांना झोंपेची आवश्यकता वाटली म्हणून म्हणा त्यांनीं तेवढ्या अवकाशांत एक झोंप काढली. लोकमान्यांचा हा एक गुण और होता. झोंपेची स्तुति सर्व देशाच्या कवींनीं केलेली आहे.कारण दुःखांचा विसर पाडण्याची शक्ति झोंपेसारखी दुसऱ्या कशांतच नाहीं. म्हणून हे दुःखाच्या जखमांवर लावावयाचें मलम वाटेल तेव्हां मिळेल तो खरोखरच भाग्यवान होय. लोकमान्य

खरोखर नशिबाचे कीं, त्यांना वाटेल तेव्हां निजण्याचें व त्याचबरोबरच उठण्याचेंहि साधलें होतें. अशाच रीतीनें विचार केला तर मी व माझे निद्रादेवीचे भक्तबंधु अर्धे ' लोकमान्य ' आहोंत असें म्हणावयास कांहींच हरकत नाहीं. कारण आम्हांलाहि वाटेल तेव्हां झोंप आणतां येतें, एवढेंच नव्हे तर जेव्हां नको असेल तव्हांहि आम्हांला झोंप येते. उदाहरणार्थ, गणिताच्या तासाला मीं अंगाला आळेपिळे देऊन झोंप येऊ न देण्याचा कसून प्रयत्न करतो. इतका कीं जागे असेतों माझें सर्व लक्ष इकडेच लागून अभ्यासाकडे बघावयास फुरसतच मिळत नाहीं. झोंपेला ' धोंडा 'देखील चालतो तो असा. अशा वेळीं डुलक्या घेणाऱ्या विद्यार्थ्यांकडे पाहून आमचे मास्तर म्हणतात, " अरे बाबांनो, अभ्यासाच्या वेळीं भुकेला ' कोंडा ' ( कोंडून टाका ) आणि झोपेला ' धोंडा ' ( दगड मारा )." असो. ह्या गुणाच्या जोरावर मी अर्धा 'लोक'मान्य झालेला असलों तरी पूर्ण लोकमान्य होण्याच्या दृष्टीनेंहि माझे प्रयत्न चालूच आहेत. वाटेल तेव्हां निजून ठरल्या वेळीं जाग येण्यासाठीं माझे नाना तऱ्हेचे प्रयत्न चालू आहेत. त्याप्रमाणें मी झोंपतों लगेच, पण उठतों, आपला ' ठरल्या वेळीं ! ' अमुक अमुक वाजतां उठावयाचेंच असा निश्चय करून मी झोंपी जातों; पण उठून बघतों तर ती वेळ केव्हांच टळलेली असते. आणि एखादे वेळीं नको वेळेवर उठलोंच तर माझा माझ्यावरच विश्वास बसत नाहीं. आपला निजण्या उठण्यावर एवढा ताबा असलेला पाहून

आपण झोपेंत तर नाहीं ना ? असाच बळकट संशय येतो, व त्याची शहानिशा करण्यासाठीं नेहमींचा चिमट्याचा तोडगा उपयोगांत आणण्याचा विचार करतों. पण लगेच स्वतःचा मूर्ख-पणा लक्षांत येऊन असे विचार मनांत येतात कीं, " आपण जर खरोखरीच झोपेंत असलों तर चिमटा घेणार कसा ? चिमटा न घेतांच चिमटा घेतल्याचा भास व्हावयाचा, किंवा चिमटा घेऊनहि समजून यावयाचं नाहीं !" असा विचार करून आपण झोंपेंतच आहोंत असा ठाम निकाल देऊन मी परत निद्रासुख अनुभवूं लागतों. पण असा प्रसंग देखील फारच क्वचित् येतो. बहुधा मी उशीरांच उठतों. पण त्याला माझा तरी काय इलाज ? एकदा झोंप लागल्यावर आपणाला अमूक एका वेळीं उठावयाचें आहे हेंच मुळीं मी विसरून जातों, आणि झोपेचा मुख्य गुण एखाद्या गोष्टीचा विसर पाडणें हाच होय. झोंप लागेपर्यंत माझा माझ्यावर पूर्ण ताबा असतो; पण एकदा झोंप लागल्यावर मात्र हा स्वप्नसृष्टींतल्या साम्राज्याचा उपयोग घेणारा सम्राट निद्रादेवीचा यःकश्चित् गुलाम बनतो. पण त्यावर उपाय काय ? नवप्रफुल्लित कमलाच्या आमोदानें सर्व रानांत स्वैर भिरभिरणारा भ्रमर आकर्षिला जातो. तो त्या कमलाच्या अद्‌भुतरम्य उदरांत शिरेपर्यंतच काय तो स्वतःचा मालक असतो. पण एकदा आंत शिरल्यावर त्यांतील रसांची गोडी चाखीत असतांना त्याला कशाचेंच भान राहात नाहीं. त्याला सायंकाळ झालेला समजून येत नाहीं, कीं अंधार पडलेला

दिसून येत नाहीं. तो पार मोहून जातो, व त्याला स्वतःची शुद्ध मुळींच राहात नाहीं. नंतर तें पद्म त्याला आपल्या कोमल दलांच्या नाजूक पाशांनीं गच्च आंवळून टाकतें व त्या भ्रमराच्या हातीं गुणगुणण्याच्या घोरण्याखेरीज कांहींच उरत नाहीं. अशा स्थितींत दुसरे दिवशीं सकाळीं उन्हाचे चटके बसून कमलदलाचे पाश आपोआप सुटेपर्यंत तो तसाच पडून राहिलेला असतो!

झोपेचे जे अनेक उपकार आहेत, त्यांपैकीं झोंपेंतलें बरळणें हा एक होय. त्यामुळें खऱ्या गुन्हेगारांचा अचुक शोध लावतां येतो. बरळण्याची भीति प्रत्येकानें मनांत वागविली तर लवकरच सत्ययुगाला सुरवात होईल. कारण एखाद्यानें आपले खरे विचार लपवून ठेवण्याचा कितीहि जरी प्रयत्न केला, तरी हा झोंपेचा फौजदार खरी हकीकत त्याच्याकडून अगदीं बेमालूम काढून घेतो. नाना फडणीसांनीं ह्या बरळण्याचा उपयोग एकदा मोठ्या चातुर्यानें करून घेतला होता. त्यांच्याकडे एकदा एक बहुभाषी गृहस्थ आला. तो गुजराती, हिंदी, मराठी, कानडी वगैरे सर्व हिन्दी भाषा अगदीं अस्खलित बोले, व त्याच्या बोलण्याचालण्यावरून त्याची मायबोली ओळखून काढणें जवळजवळ अशक्यच होतें. नानांच्या चातुर्याची ख्याति ऐकून तो माणूस त्यांच्याकडे आला होता. सर्व भाषा त्यांना बोलून दाखविल्यानंतर "माझी मातृभाषा कोणती?" असा त्यानें

नानांना प्रश्न केला. त्यांनीं " ह्याचें उत्तर तुला उद्यां देईन " असें सांगून, त्याच्या भोजनशयनाची व्यवस्था केली. नंतर रात्रीं तो पोटभर जेवून गाढ निजला असतां त्याच्या तोंडावर पाण्याचे शिडकावे मारून त्याला अर्धवट जागें केलें व त्याला एक प्रश्न विचारला. लगेच त्यांचें काम झालें. दुसऱ्या दिवशीं " तूं गुजराती आहेस " असें नानांकडून बिनचुक उत्तर आलेलें पाहून तो गृहस्थ आश्चर्यसागरांत गटांगळ्या खाऊं लागला. असो. अशा रीतीनें आपले खरे विचार झोंपेंत आपणाला नकळत केव्हां प्रगट होतील ह्याचा नेम नसल्यामुळें आपण नेहमीं चांगलेच विचार करीत असावें, हें उत्तम!

झोंपेंत बरळण्याबरोबर घोरण्याचीहि आणखी एक क्रिया करतां येते. ' तुम्ही झोंपेंत घोरतां ' असें जर आपणाला कोणी सांगितलें तर आपण तें कधींहि कबूल करीत नाहीं. कारण आपण तें बेशुद्धींतच करतों, असें म्हणावयास कांहींच हरकत नाहीं, व बेशुद्धींत केलेलीं कामें आपलीं नव्हेत हेंहि खरेंच आहे. पण आपणाला जरी झोंपेंत घोरण्याची संवय असली, तरी त्यांत एवढा घोर बाळगण्यासारखें काय आहे कीं आपण तें तावातावानें नाकबूल करावें? आपण झोंपेंत घोरतों हें आपणाला दुसऱ्या कोणी सांगितल्याशिवाय कळणें शक्य नाहीं. माझ्या माहितींतला फक्त एकच माणूस असा आहे, कीं ज्याला आपण झोंपेंत घोरतों हें आपलें आपणच समजून आलें आहे. ह्या गृहस्थाला नेहमीं स्वप्नें पडत व त्यांत वाघ गुरगुरल्याचा भास होई; परंतु

त्याला आपणाला वाघाच्या गुरगुरण्याचींच स्वप्नें कां पडा-वींत याचा उलगडा होईना. नंतर एक दिवस त्यानें त्या वाघाला पकडलें, पण जागें झाल्याबरोबर त्या वाघानेंहि गुर-गुरण्याचें बंद केलें आहे असें त्याला आढळून आलें. आणि कर्मधर्मसंयोग असा कीं, त्या गृहस्थाचें नांवहि वाघ असेंच होतें.

पुष्कळ लोक झोंपेची अपायकारक व्यसनांत गणना कर-तात, व तिला धूम्रपान, मदिरापान ह्यांच्या जोडीला बस-वितात. पण झोंपेंत व त्यांच्यांत फार फरक आहे. इतर व्यसनापासून जसा त्रास होतो तसा झोंपेपासून मुळींच होत नाहीं. धूम्रपानाचा शोकी धुराला आपली स्वर्गांत आगाऊ तयारी करून ठेवावयास म्हणून पाठवीत असेल, मदिरासक्त स्वतःचीच तिरडी रचीत असेल; पण घोरणारा माणूस मात्र स्वतःचीच निरुपद्रवी अंगाई गात असतो.

कुंभकर्ण सहा सहा महिन्यांनीं एकदां जेवाखावयास उठे, बाकी सर्व काल तो निजूनच काढी. हा सर्व परिणाम त्यानें इंद्रपदाऐवजीं निद्रापद जें चुकून मागितलें त्यामुळेंच झाला. पण त्या झोंपाळूपणामुळें त्याचा केवढा फायदा झाला, याचा कोणी तरी विचार करतो काय ? इन्द्राचा कांटेरी मुगुट डोक्या-वर ठेवून त्यांत सांठविलेल्या काळज्या व चिंता आपल्या डोक्यांत ओतून घेण्याचें त्याचें आपोआपच टळलें. घटको-घटकीं असुरांशीं युद्ध करावयाचें, पुष्कळदां पराजयहि अनु-भवावयाचे, आणि मग झोंपाळू विष्णूकडेच धांव घ्यावयाची;

कोणी तपश्चर्या करावयास लागला कीं, वाळवंटांतल्या शिले-प्रमाणें सिंहासन तापून चटके बसावयाचे! त्याच्यामागच्या ह्या सर्वच कटकटी चुकल्या. स्वभावानें दुष्ट असा तो कुंभकर्ण जर जागाच राहिला असता, तर त्याच्या मनांत नाना तऱ्हांच्या राक्षसी विचारांनीं ठाणें दिलें असतें, व त्याच्या हातून अनेक अनन्वित कृत्यें घडून तो रौरवाचा धनी झाला असता. पण केवळ निद्रादेवीचा वरदहस्त त्याच्या माथ्यावर असल्यामुळें तो पुण्यवान् राहिला. इंद्रपद न मिळाल्यामुळें त्याचा अप्सरांशीं संसर्ग आला नाहीं, व तो नीतिमान् राहिला. एकट्या निद्रादेवीचाच दासानुदास राहिल्यामुळें परस्त्रीच्या वाटेस जाण्याचें पाप त्याच्या हातून घडून आलें नाहीं, व त्यामुळेंच त्यानें एक-पत्नीव्रत रामाचीहि बरोबरी केली. सारांश, त्या क्रूर व्याघ्रावर निद्रेची लोकर चढतांच तो गरीब मेंढरू बनला, व त्या लोकरीचा उपयोग त्याला स्वतःला पापाच्या थंडीपासून रक्षण करण्यास, व इतरांनाहि निर्धास्ततेच्या सुखाची ऊब देण्यास झाला.

कुंभकर्ण एकदा झोंपी गेल्यावर मोठमोठे वृक्ष, आणि प्राणी त्याच्या श्वासोच्छ्वासाबरोबर त्याच्या नाकांत जात व उच्छ्वासा-बरोबर परत जोरानें बाहेर फेंकले जात; इतका तो अवाढव्य होता. एकदा तर एक न्हावी आपल्या शस्त्रासह आंत ओढला गेल्याचा रामायणांत उल्लेख आहे. ( ‘ पुच्छप्रगति ’ करणाऱ्या संशोधकांस येथें चांगलेंच कुरण आहे. त्यांनीं असा सिद्धांत ठोकून द्यावा कीं, रामायणकालीं मिशा काढण्याची ‘ फॅशन ’

अस्तित्वांत असावी. नाहींतर तो न्हावी कुंभकर्णाच्या नाकांत जाण्याची शक्यताच नव्हती. ) तो कारागीर त्याच्या एखाद्या नाकपुडीला घट्ट बिलगून आपलें काम इमानें इतबारें उरकीत असावा. कामांत पूर्ण रंगून गेल्यामुळें त्याला आपण कोठें आहोंत ह्याचें भान न राहून नेहमीच्या संवयीप्रमाणें डाव्या हातावर वस्तऱ्यावर सांचलेला साबणाचा फेस त्यानें पुसून काढला असावा. पण असें करतांना साहजिकच त्याला कसलाच आधार न राहून तो कुंभकर्णाच्या श्वासाबरोबर आंत ओढला गेला असावा. ह्या वेळीं तो न्हावी कुंभकर्णाच्या वरील ओठावर उभा असावा; किंवा, मोठी इमारत बांधतांना मोठमोठ्या तुळयांचा पहाड बांधतात, त्याप्रमाणें एखादी योजना करण्यांत आली असावी. अर्थात् हा तर्कच आहे. नंतर तो न्हावी कुंभकर्णाच्या शरीरांतून विजेच्या वेगानें एक चक्कर मारून त्याच्या काळजाचा ( असेल तर ) ठाव लागल्यानंतर ( किंवा कदाचित् न लागतांच ) ज्वालामुखीच्या विवरांतून बाहेर फेकल्या जाणाऱ्या लाव्हारसांतल्या एखाद्या फत्तराप्रमाणें अचाट वेगानें बाहेर फेकला गेला असावा. ह्यावरून कुंभकर्णाचें अवाढव्य शरीर किती सुंदर दिसत असेल ह्याची कल्पना होईलच. मग तो अधिक वेळ जागा राहिला असता, तर त्यानें आपल्या टेकडीच्या उशीवरून डोकें उचलून समोर पसरलेल्या हिंदीमहासागराच्या आरशांत आपलें रूप पाहिलें असतें, आणि वैताग उत्पन्न होऊन त्याच्या हातून आत्महत्त्येसारखें भयंकर पाप घडून आलें

असतें. पण केवळ झोंपेनेंच त्याला त्यापासून परावृत्त केलें. ह्यावरून हेंच दिसून येतें कीं झोंपेपुढें झोपाळू माणसाला साधे उद्योग करावयास देखील वेळ मिळत नाहीं, मग पापाची गोष्टच कशाला?

झोंपेवर आक्षेप घेणारे मुख्यतः दोन प्रकारचे लोक आहेत. एक प्रकार, ज्यांना झोंपच येत नाहीं अशा म्हाताऱ्या-कोताऱ्यांचा, व दुसरा ज्यांना झोंप नको आहे अशा संशो-धक, शास्त्रज्ञ, तत्त्वज्ञानी वगैरेंचा. पहिल्या प्रकारच्या लोकां-वर झोंप आपली जादू कां चालवीत नाहीं? हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे. एक तर निद्रादेवीच्या चरणाशीं लोळण घेण्यास कित्येक तरुण एका पायावर तयार असतां, तिचें मन म्हाताऱ्यावर बसेल हें शक्यच नाहीं. दुसरें असें कीं, जे लवकरच तिच्याकडे कायमचे जाणार आहेत, अशा वृद्धांमध्यें तिला गोडी वाटत नसावी. किंवा जे बिचारे वयोमानाच्या ओझ्यामुळें वांकून गेले आहेत, व अनेक काळज्यांनीं हैराण झाले आहेत, अशांना जिंकण्यांत तिला कांहीं पुरुषार्थ वाटत नसावा. झोंपेविरुद्ध ओरड करणारे बरेचसे वृद्धच असतात, हें मात्र खरें. द्राक्षें मिळालीं नाहींत म्हणजे तीं आंबट. मला वाटतें, झोंपेविरुद्ध जे वाक्प्रचार व म्हणी आहेत ते सर्व अनुभवी म्हाताऱ्यांनीच झोंप न आल्यामुळें मिळालेल्या रिकाम्या वेळांत तयार केलेले असावेत.

झोंपेविरुद्ध बंड पुकारणाऱ्यांचा दुसरा वर्ग म्हणजे शास्त्रज्ञ वगैरेंचा हें मागें सांगितलेंच आहे. ह्यांनीं तर उघड उघड

बंडाचें निशाणच उभारलेलें असल्यामुळें त्यांचा डोळ्याला डोळा लागणें शक्यच नाहीं. कोठल्या तरी विषयाच्या मागें लागून हे झोंपेच्या सुखाला पारखे होतात. कवि-लेखकांचीं तर नेहमीं बाळंतपणेंच चाललेलीं असल्यामुळें त्यांच्या प्रसववेदनांपुढें त्यांना झोंप येणेंच शक्य नाहीं. ह्याचा अनुभव तर खुद्द मलाच आहे. हा लेख लिहून होईपर्यंत तर डोळ्याला डोळा लागला नाहीं. नंतर संपादकांकडून तो आपल्या साप्ताहिकांत प्रसिद्ध करण्याचें अभिवचन मिळेपर्यंत जीवांत जीव नव्हता. आतां प्रसिद्ध झाल्यावर तरी झोंप यावी, पण त्याचेंहि नांव नाहीं. ह्याला वाचून दाखव, त्याला वाचून दाखव, त्यांनीं हंसावें अशी जेथें माझी अपेक्षा, तेथें कोणींच न हंसलेलें पाहून हिरमुसल्या तोंडानें तेथल्या खोंचाचें स्पष्टीकरण कर, ह्यापुढें झोंप काढावयास मला फुरसतच नाहीं. अशी माझ्या डोळ्यांवरची झोंप कशी उडून गेली, किंवा झोंपेच्या नजरेंतून मी कसा उडून गेलों ह्याचेंच मला आश्चर्य वाटतें! पण त्यांत तरी काय मोठेसें?...आपले गोडवे गाणाऱ्या एकनिष्ठ भाटाला निर्भेळ आनंदाचें सुख भोगूं देण्याचें तिच्या मनांत आलें असेल किंवा माझी ही झोंपेंतली बडबड ऐकतांना तुमच्यांपैकीं अनेकांप्रमाणें तिलाहि झोंप येऊन ती, जगाच्या आरंभापासून अविश्रांत काम करून थकली भागलेली निद्रादेवी, कोठेंतरी डुलक्या घेत बसली असेल!

# संपादकास पत्र : ८

संपादक महाशय यांसी,

सा. न. वि. वि. आपण माझा लेख प्रसिद्ध करण्याची कृपा केलीत ह्याबद्दल मी आपला आभारी आहें. इतका कीं, मला माझे आभार लिहूनच व्यक्त करावयाचें झाल्यास ह्यापुढं इतर विषयांवर लिहिण्याचें सोडून देऊन मला सर्व लेख आभार--प्रदर्शनार्थच लिहावे लागतील. मी इतर विषयांवर लेख-गोष्टी लिहिणार नाहीं, हें वांचून असे खिन्नवदन होऊं नका. कारण मी माझा हा लेखन-व्यवसाय असाच अव्याहत चालू ठेवणार आहे, व झाडून साऱ्या विषयांवर (कांहींना) कांहीं तरी लिहून महाराष्ट्र सारस्वतांत अमूल्य भर घालणार आहे. परंतु ह्या माझ्या पवित्र कर्तव्यांत मला आपल्या सहाय्याची अपेक्षा आहे हें काय सांगावयास पाहिजे? हा वाङ्मयक्षितिजावरील उदयोन्मुख तारा आपण आपल्या मासिकरूपी दुर्बिणीच्या द्वारें सर्व रसिकांस खुला करून दिला

आहे. हे उन्मत्त गजराज ! ( संपादकमहाशय, जरा क्षमा करा. पण अशी सुंदर उपमा दिल्याशिवाय मला राहवतच नाहीं ! ) हें नवविकासित कमल न तुडविण्याचें सर्वस्वीं आपल्याच हातांत-किंवा अधिक सार्थ शब्दांत सांगावयाचें म्हणजे पदकमलांतच आहे. जगाच्या एका कोपऱ्यांतील प्रतिकूल दैवाच्या डबक्यांत जें दोन दिवसांनीं उगाच वाळून गेलें असतें तें कमल-पद्म-आपण सोंडेनें खुडून घेऊन आपल्या नियतकालिकरूपी गंडस्थळावरील नवरसपरिप्लुत लेख-समुदायरूपी मदाच्या आशेनें जमलेल्या रसिकभृंगवृंदाला उपभोगास्तव सुकर करून दिलेलें आहे. ह्या नारळावरील शेंडी काढून...! कितीहि लिहिलें तरी अपुरेंच पडणार, आणि लिहिण्यावांचून तर राहवत नाहीं. पण जाऊंच दे !

माझा लेखनव्यवसाय हल्लीं जोरांत चालू आहे. शाळेला सुट्टी असल्यामुळें रिकामपण भरपूर आहे, व आठवड्याच्या परीक्षांचे पाठकोरे कागदहि संबंध महिनाभर पुरतील इतके आहेत. ह्या पत्रासोबत मी आपणाकडे एक छोटीशी पण नवरसयुक्त ( ‘ नव ’ म्हणजे ‘ नवीन ’ शिवाय ‘ नऊ ’ असाहि अर्थ )--जशी प्रति वामनमूर्तीच कीं मूर्ति लहान, पण कृति मोठी--अशी गोष्ट पाठवीत आहे. तिलाहि आपण उदार मनानें आपल्या लोकप्रिय मासिकांत कृपा करून खास जागा द्याल अशी फार फार आशा आहे. ती गोष्ट पुढीलप्रमाणें:—
( कोठला रस कोठें आहे, हें आपणास समजण्यास सोपें जावें

म्हणून लगेच कंसांत त्याचें नांव दिलें आहे. अर्थात् मासिकांत तें छापूं नये. )

## मारवाड्याच्या घरचें लग्न !

( एक नवरसपरिप्लुत छोटी गोष्ट )

तो प्रातःकालचा शांत आणि गंभीर असा समय होता. रानांत पक्षी किलबिलूं लागले असतील. अजून सूर्यराजानें पूर्वेच्या सोनेरी खिडकीबाहेर डोकावलें नव्हतें. ( शांत रस ) अशावेळीं विक्रमपुरांत एका घरीं बरीच धांदल दिसून येत होती. त्या घरासमोर एक लॉरी उभी होती, व तिचा सारथी ( ड्रायव्हर ) आपल्या धोतरावर ठिगळें लावलेली खाकी पाटलोन ओढओढून चढवीत होता. त्या जुनाट घराच्या मोठ्या दरवाजाच्या दिंडींतून बायका भराभर बोचकीं घेऊन बाहेर पडत होत्या. त्यांत वृद्ध स्त्रिया होत्या तशाच तरुणीहि होत्या. त्यांनीं सुंदर व भारी पोषाख केलेला होता. ( शृंगार ) वृद्ध स्त्रियांचे चेहरे व त्यावरील सुरकुत्या स्पष्ट दिसून येत होत्या. पण त्यांच्याबरोबरच्या तरुणींनीं मारवाडी चालीप्रमाणें तोंडावरून ओढणी घेतलेली असल्यामुळें, त्यांच्याकडे आशाळ-भूतपणानें पाहात असलेले तरुण हिरमुसले होत होते ( विरस ) लवकरच त्या बायका आपापल्या कच्च्याबच्च्यांसह मोटारींत खेटाखेटी करून बसल्या, व मोटारीचे ' हँडल ' मारण्यांत

पांचएक मिनिटें गेल्यावर तिचें यंत्र घरघरूं लागलें. इतक्यांत घरांत राहिलेल्या बायकांची व मोटारींतून निघालेल्या बायकांची ' आवजो ' ' आवजो ' अशी एकच ओरड सुरू झाली, ती मोटार दिसेनाशी होईपर्यंत. घर दृष्टीआड झाल्यावर मोटारींतील स्त्रिया मारवाडी संगीत गाऊं लागल्या. ( येथें श्रोत्यांच्या मनोभूमिकेप्रमाणें करुण किंवा वीररस उत्पन्न होत असे. ) लवकरच मोटरीनें गांवांतील गल्ल्याबोळांना मागें सारून गांवाबाहेरील,उसाचे मळे दुतर्फा असलेल्या रस्त्यावर प्रवेश केला. तेहि पाठीमागें पडून मोटार हां हां म्हणतां डोंगराच्या पायथ्याशीं आली, व लवकरच चढणीस लागली. थोड्याच वेळांत ती एका उंच कड्यावर येऊन पोहोंचली. एका बाजूला काळीकभिन्न गगनचुंबित शृंगशिखरें, तर दुसऱ्या बाजूला खालीं पाहिलें तर डोळे फिरतील अशी खोल अरण्यमय अंधःकारपूर्ण दरी. उतरणीवर गर्द रान व त्यांत हिंस्र श्वापदें ! (रौद्र) अशा प्रदेशांतून ती मोटार त्या गाणाऱ्या बायांना घेऊन फों फों करीत वळणावळणाच्या रस्त्यानें जात होती. त्यांचा प्रवास निर्विघ्नपणें चालला होता. इतक्यांत मोटार एका मोठ्या शिलेवर जाऊन आपटली, व तिच्या ठिकऱ्याठिकऱ्या उडाल्या. ( भयानक. ) कारण त्या मोटारड्रायव्हरचें लक्ष त्या मारवाडी बायांच्या गाण्यानें पूर्ण मोहून गेलें होतें ( अद्‌भुत. ) आजूबाजूस फेंकल्या गेलेल्या बाया पूर्वीप्रमाणेंच गातांना दिसून येत होत्या. त्यांच्या ओढण्या ह्या गडबडींत अस्ताव्यस्त

झाल्या होत्या, आणि त्यांच्या डोळ्यांतून वाहणारे अश्रु मात्र दिसून येत होते.

( ही सर्व गोष्ट वाचून हास्यरस उत्पन्न होतो असें मला वाटतें. )

असो, रा. बापूजींना आपण चांगलेच ओळखत असाल. त्यांचीं आपलीं जितकीं पत्रोत्तरें झालीं तितकीं दुसऱ्या कोठल्याहि ' जोडप्या 'चीं झालीं नसतील. त्यांनीं रोज एखादा लेख तिकिटासह पाठवावा, व आपणांकडून तेवढ्याच जाडीचें प्रत्युत्तर न चुकतां परत यावें, असा क्रम एक वर्षभर तरी नव्हता का चालला ? ते लेखक नसले तरी उत्तम टीकाकार मात्र खास आहेत. टीकाकार हा उत्तम लेखक असलाच पाहिजे, असें नाहीं; ह्या नियमाचें ते उत्तम उदाहरण होत. त्यांचा वाङ्मयाचा व्यासंग दांडगा आहे. कोठलाहि लेख ते फारच काळजीपूर्वक वाचतात, व त्याचा अगदीं सूक्ष्म रीतीनें ( criticallv ) फारच परिश्रमपूर्वक अभ्यास करतात. प्रत्येक लेख कितपत यशस्वी झाला आहे, त्याची मध्यवर्ति कल्पना काय, तिचा योग्य विकास झाला आहे किंवा नाहीं, त्यांतील कल्पना लेखकाला कशा व कां सुचल्या असतील, लेख लिहितांना लेखक कोणत्या परिस्थितींत होता, ह्याबद्दल ते खूपच खल करीत असतात. ह्यावर एकच उदाहरण द्यावयाचें म्हणजे पर्वाच्या त्यांच्या ' वाङ्मय-चौर्य मंडळांत ' झालेल्या व्याख्यानांतून देतां येईल.

विषय हरिभाऊंचा ( टीकाकार नेहमीं मोठमोठ्या लेखकांना जणूं काय तो आपला लंगोटीमित्र आहे असें समजूनच संबोधीत असतो. ) ‘ खंडाळ्याच्या घाटांतील देखावा ’ हा निबंध होता. व्याख्यानाला विद्यार्थीवर्गाची बरीच गर्दी जमली होती. उपरिलिखित शब्दचित्रांत, टीचभर पोटाची खळगी भरण्यासाठीं रानावनांत, थंडीपावसांत कुडकुडत राहणाऱ्या एका देवडीवाल्याचें चित्र हरिभाऊंनीं रेखाटलेलें आहे.तें वाचतांना प्रत्येकाला त्या देवडीवाल्याची कींव येते.पण बापूजी नुसती कींव करूनच स्वस्थ बसणार नव्हते. नेहमींच्या संवयीप्रमाणें त्यांनीं प्रश्न केला, तो पोर्टर ‘ टीचभर पोटाच्या खळगीसाठीं ’ तेथें राबतो आहे, ही कल्पना हरिभाऊंना कशी सुचली असावी ? ह्या महत्त्वाच्या मुद्यावर त्यांनीं अनेक दिवस विचार केला होता, व शेवटीं त्याचें उत्तरहि त्यांना मिळालें होतें. हरिभाऊ आगगाडींतून चालले असतांना त्या पोर्टरला बघून त्यांनीं मनाशींच प्रश्न केला असावा, “ हा एवढा त्रास कशासाठीं घेत असावा बरें ? ” आणि लगेच त्यांना आगगाडीच्या एन्जिनकडून उत्तर मिळालें, “ कशासाठीं ? पोटासाठीं ! कशासाठीं ? पोटासाठीं ! ” ह्या तर्काविरुद्ध कोणासच शंका घ्यावयास जागा नाहीं. ह्या लहानशा उदाहरणावरून टीकाकार ह्या नात्यानें बापूजींचा अधिकार किती दांडगा आहे, ह्याची कल्पना आपणांस आलीच असेल. त्यांना मी आपणांस पाठवीत असलेली लघुकथा दाखविली. आणि त्यांनीं त्यांतून आपल्या गरुड-दृष्टीनें आणखी एक नवाच रस शोधून काढला.

" अरे, हा बघ आणखी एक दहावा रस निघतोय तुझ्या गोष्टींतून ! "

"कोठला ? " मी औत्सुक्यानें व आनंदातिशयानें विचारलें.

" अरे, ती मोटार उंसाच्या मळयावरून नाहीं का गेली ? मग उंसाचा रसहि ओघानें आलाच. "

मी तर बापूजींच्या मार्मिकतेपुढें दिपूनच गेलों. असो.

ह्यांत एक बीभत्स रस तेवढा गाळण्यांत आला आहे. पण तें काम मी एका ' ऋग्वेदांत अश्लील वर्णनें आहेत ' ह्या पुराव्यावर स्वतःच्या टाकाऊ काव्याचें समर्थन करणाऱ्या व स्वतःला महाराष्ट्रभाषेंतील अश्लील काव्याचा प्रवर्तक म्हणवून घेण्यांत भूषण मानणाऱ्या एका कविब्रुवाकडेच सोंपवितों.

पत्र बरेंच लांबलें. माझा हा लेख कृपा करून छापावयाचा झाल्यास माझ्या मागल्या प्रसिद्ध झालेल्या लेखावरून आपणाला कांहीं सूचना कराव्याशा वाटतात. तिकडे अवश्य लक्ष द्यावें.

माझा गेला लेख आपण मित्रत्वाला जागून प्रसिद्ध केला, व त्याची एक प्रत आपण माझ्याकडे पाठवून दिली असें आपण लिहितां. पण सध्यांच्या पोस्टांतील कारकुनांच्या व शिपायांच्या वाढत्या वाचनाभिरुचीमुळें मला त्या माझ्या पहिल्याच अपत्याचा बळी द्यावा लागला. आपण ह्या विषयीं आपल्या मासिकांतून योग्य ती ओरड करून व्यवस्था लावालच.

माझा लेख प्रसिद्ध झाला आहे हें कळतांच, धांवतच जाऊन किताबखान्यांतून मीं एक अंक विकत घेतला. पण तो उघडून पाहातांच माझी किती निराशा झाली म्हणून सांगूं! कारण माझा लेख मला मुळींच सांपडेना. मी तो अंक दोन-चारदा चाळून पाहिला. कदाचित् ह्याच प्रतींत तो लेख राहिला असेल असें वाटून त्याच्याबद्दल दुसरी एक प्रत घेतली. पण त्यांतहि माझी निराशाच झाली. म्हणजे मला कोणीतरी थापच ठोकून दिली तर! ह्या विचारानें खिन्न होऊन परतलों असतां मला बापूजींनीं माझा लेख दाखविला. त्या वेळीं बापूजींना अगदीं कडकडून आलिंगन द्यावेंसें वाटलें. बापूजी म्हणजे परमेश्वराचा अवतार भासला. माझा लेख मला सांपडूं नये ह्याचें कारण आपण माझा लेख पार बदलून टाकला आहे हें होय. तो लेख माझाच असा भरंवसा मला वाटेना. असहकारितेच्या ऐन हंगामांत खादीचा पोषाख करून मिरविणाऱ्या एकाद्या दे. भ. नें दोन दिवसांनंतर ' अपटुडेट ' विलायती पोषाखांत फिरावें, त्याचप्रमाणें माझ्या लेखाचें झालें आहे. मारुतीच्या मूर्तीवरील शेंदराचीं पुटें काढून टाकल्यावर ती मूर्ति जशी रोड, किडकिडीत व अनोळखी भासूं लागते, तशीच माझ्याहि लेखाची स्थिति झालेली आहे. कारण माझ्या लेखाला जेथें तेथें कात्री लावलेली आहे. फार काय त्याचा मथळाहि पार बदलून टाकला आहे. बाकी माझा हा मानसपुत्र मुंबईला जाऊन बहकला, व मला न ओळखतां येण्याइतका त्याच्यांत फरक पडला तर त्यांत नवल नाहीं

म्हणा! मुंबईची हवा खाऊनहि त्याला आपल्या खेडवळ पित्याचें नांव शिरसामान्य आहे हेंच काय थोडें आहे? असो. सांगण्याचा इत्यर्थ इतकाच कीं, होतां होईल तों लेख जशाचा तसाच छापावा, नाहीं तर काल जशी, त्यांतील तुम्ही घातलेल्या एका वाक्याचा अर्थ मला विचारल्यावर माझी फजिती झाली, तसें प्रसंग वारंवार यावयाचे! आणखीहि बऱ्याच सूचना केल्या असत्या; पण तो लेख प्रसिद्ध झालेला अंक मजकडून जो एकानें 'वाचावया'स म्हणून नेलेला आहे, तो पृथ्वीप्रदक्षिणा केल्याखेरीज परत यावयाची आशा नको! म्हणून एवढ्या ज्या लक्षांत होत्या त्या सूचना करूनच मी लेखणी आवरती घेतों.

आपला कृपाभिलाषि,
गोम्या गणेश.

ता. क.

सोबत पाठविलेला लेख जरूर जरूर प्रसिद्ध करणें.

गो. ग.

ता. क. नं. २.

आपण माझ्या पत्रांत नेहमी ताजा कलम असतो म्हणून तक्रार करतां; पण जरा विचार करतांच आपणाला त्याचें महत्त्व कळून येईल. पोटभर जेवणाच्या शेवटीं जसें भाताबरोबर ताक हें पाहिजेच, त्याशिवाय जेवणास पूर्तता नाहीं, त्याचप्रमाणें

प्रत्येक पत्राच्या शेवटीं ह्या 'ता. क.'चीहि जरूरी आहे असें माझ्या अल्पमतिला वाटतें. नाहीं तर हें 'ताक' न वाढल्यास मला जें आपणांस बजावून सांगावयाचें आहे तें आपल्या गळीं नीट उतरणार तरी कसें ? असो.

आपला लोभांकित

गोम्या गणेश.

# जीभ आणि लेखणी : : ९

एका म्यानांत दोन तलवारी राहूं शकत नाहींत, एका घरांत दोन सवती सलोख्यानें नांदूं शकत नाहींत, त्याचप्रमाणें एकाच व्यक्तींत जीभ आणि लेखणी यांचे गुण परमोत्कर्षास पोहोंचल्याचें दिसून येत नाहीं. सरळ सांगावयाचें म्हणजे एकच मनुष्य उत्तम राजकारणी व त्याच वेळीं खंदा लेखक म्हणून दिसणें फारच विरळा ! लक्ष्मी आणि सरस्वती ह्यांच्या-इतकेंच जीभ आणि लेखणी ह्यांच्यांत सख्य आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. पूर्वीच्या पाठांतराच्या काळीं सरस्वतीचें आसन जिव्हाग्रावर असेल, परंतु सध्यांच्या छापखान्याच्या युगांत मात्र तें लेखणीच्या जिव्हाग्रावर येऊन बसलेलें आहे, ह्यांत मुळींच संशय नाहीं.

ह्या शरीरांत दोन राजे राज्य करीत आहेत, असें म्हणावयास हरकत नाहीं. एक राजा कवटीच्या बालेकिल्ल्यांत बसलेला मेंदू होय, आणि दुसरा म्हणजे छातींत फुफ्फुसाच्या

गाद्यागिरद्यांत लोळत राहून राज्य करणारें हृदय ! जिभेला मेंदूचो प्रधानगिरी मिळाली आहे,तर हृदयाचा लेखणीवर दांडगा विश्वास आहे. हृदयाचीं कामें करण्यास जीभ असमर्थ ठरलेली आहे, तर मेंदूचे लपंडावाचे खेळ खेळण्यास लेखणी कुचकामाची ठरते. निराळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे जीभ म्हणजे राजकारण, आणि लेखणी म्हणजे वाङ्मय होय. बुद्धिप्रधान राजकारणी लोकांत जीभ अधिक प्रभावशाली असते, तर भावनाप्रधान साहित्यिकास लेखणीइतकी उपयुक्त वस्तुच नाहीं. बुद्धिप्रधान लोक राजकारणांत पडतात. त्यांत त्यांना अनेक लपंडाव खेळावयाचे असतात, अनेक छक्केपंजे लढवावयाचे असतात. मनांतील हेतु एक असतो, तर भासवावयाचें दुसरेंच असतें. एका प्रसिद्ध पुरुषानें म्हटलें आहे कीं, "जीभ ही माणसाचे विचार प्रकट करावयास दिलेली नसून ते लपवून ठेवण्यास दिलेली आहे." अशा तऱ्हेची मानभावी जीभ राजकारणांत फारच उपयोगी पडते. आज दिलेलीं वचनें राजकारणांत उद्या कार्यभाग झाल्यावर विसरून जावयाचीं असतात. अशा कामीं वज्रलेप करणारी लेखणी निरुपयोगी ठरते; परंतु आपण काय बोलतों आहोंत ह्याचा मागमूससुद्धां राहूं न देणारी जीभ तें काम फार सफाईनें करूं शकते. जीभ आपल्या खुणा वाऱ्यावर करून ठेवते; एखाद्या मंद झुळुकीनेंहि त्या पुसून जाऊं शकतात.

वरील कारणामुळेंच मुखदुर्बळ लेखकांपेक्षां जिभेचे कुशल वार करणारे वक्तेच राजकारणांत पुढें येऊं शकतात. वकील

आणि व्यापारी ह्यांच्या जिभा आपआपल्या धंद्यांत चांगल्याच तयार झालेल्या असतात; त्यामुळें राजकारण करणें त्यांना सोपें पडतें, हा अनुभव तर सर्वांचाच आहे. ओठांच्या आणि दंतपंक्तींच्या आड राहून बोलणारी जीभ आपल्या तोंडावरील विकार समजूं न देणाऱ्या एखाद्या बुरखेवाल्या स्त्रीप्रमाणें आहे. तिचा ठाव लागणें फारच अवघड ! लेखणीची गोष्ट मात्र अगदीं उलट आहे. लेखणी म्हणजे लेखकाची पत्नीच होय. लेखक आपलें सर्व हृदय तिच्याजवळ मोकळें करतो. आपल्या मनांतील विचारांचें अक्षर न् अक्षर तिला समजावून देतो आणि लेखणीहि ते विचार वज्रलेप करून ठेवते. स्त्रियांच्या सुप्रसिद्ध निसर्गसिद्ध खोडीमुळें तिच्या पोटांत कांहींच गुप्त राहूं शकत नाहीं, आणि त्यामुळें लेखकाच्या हृदयाची सर्व जगाला माहिती होते. लेखणीचीं वाक्यें म्हणजे आरशांत पाहावयास मिळालेलें लेखकाच्या हृदयाचें स्वच्छ प्रतिबिंबच नव्हे काय ?

लेखणी अगदीं साधी आणि सरळ आहे. जिभेसारखें तिला वांकडें होतां येत नाहीं, किंवा ती कधींहि आडून मारा करीत नाहीं. ती बिचारी बाळबोध वळणाची आणि धोपटमार्गी आहे. स्त्रीस्वभावानुसार तिला दागदागिन्यांची फार हौस आहे. दुःखाच्या कालांत लेखकाला तीच एक आश्रयस्थान असते. ती जवळ असली म्हणजे तो तहानभूक विसरतो; झोपेची त्याला शुद्ध राहत नाहीं. तिच्या सान्निध्यांत त्याला स्वर्गसुखहि तुच्छ वाटूं लागतें. नाना रत्नांचे अलंकार धारण करून पांढऱ्या

शुभ्र कागदाच्या गालिच्यावर ती जेव्हां मनोरम नृत्य करूं लागते, तेव्हां तें पाहण्यांतच लेखकाचें भान हरपून जातें. तिच्या सुकुमार पदक्षेपामुळें होणाऱ्या 'रुमछुम' नादाच्या श्रवणसुभग संगीतानें त्याचें मन वेधून जातें. तिचीं त्या गालिच्यावर उमटलेलीं कोमल पावलें वारंवार पाहण्यांत तो इतका तल्लीन होऊन जातो कीं, त्या निरीक्षणांत वेळ कसा निघून जातो, हें त्याला मुळींच समजून येत नाहीं !

जीभ आणि लेखणी ह्यांची तुलना करतांना लेखणीच्या बाजूनें पक्षपात केल्याचा कोणीं माझ्यावर आरोप करतील. परंतु पत्नीविषयीं कोणालाहि आपलेपणा वाटत नाहीं काय ? जिनें माझ्या आयुष्यांत शाईच्या रूपानें अमृतसिंचन केलें, तिच्याशीं मी बेईमान कसा होऊं ? तिच्यावरील माझ्या नितांतप्रेमामुळें मला तिचे दोष न दिसून मीं तिची नुसती स्तुतिच आरंभल्यास मी दोषी ठरेन काय ? आणि समजा, मनाचा मोठा हिय्या करून मीं तिचें दोषादिग्दर्शन केलें, तर माझी काय शोचनीय स्थिति होईल, त्याचा कोणी तरी विचार केला आहे काय ! मानवी स्त्रीला एकच जीभ असते, तरी ती एकदा चवताळली तर जीव नकोसा करून टाकते. ह्या लेखणीला तर दोन जिभा आहेत. ती संतापली, तर माझे हाल कुत्रा देखील खाणार नाहीं. नाहीं तर याच्या उलट पाहा. ती माझ्या ह्या स्तुतिगानामुळें प्रसन्न झाली, तर ती माझ्या मुठींत राहील. आणि नाना तऱ्हांच्या अलंकारांनीं सज्ज होऊन, सर्व लोकांचें लक्ष आपणाकडे आकर्षित करीत

ती माझाच नांवलौकिक वाढवीत सर्व जगभर मिरवीत फिरेल !

लहानपणापासून लेखणी आणि कमलासना लक्ष्मी एकाच सरोवराच्या पृष्ठभागावर खेळल्या. परंतु जसजसा त्यांच्यांत तारुण्याचा प्रादुर्भाव होऊं लागला, तसतशी त्यांच्यांत असूया उत्पन्न होऊं लागली. लक्ष्मी सरोवराची लाडकी कन्या म्हणून तो तिला आपल्या कमलरूपी नाजुक करांवर खेळवी. लेखणी-कडे मात्र त्याचें दुर्लक्ष असे. त्यामुळें लक्ष्मी चढेल बनली. ज्या वेळीं लेखक तेथें आला, त्या वेळीं त्यानें सरळ हृदयाच्या गरीब लेखणीलाच माळ घातली. लक्ष्मीचें सर्व वैभव त्याला मोह घालूं शकलें नाहीं. त्यामुळें लक्ष्मीच्या रोषाचें मात्र तो स्थान होऊन बसला. तिनें त्याच्यावर सूड उगविण्याचें मनांत आणलें, आणि त्याच्यावर बहिष्कार पुकारून, दारिद्र्यांत आणि हालअपे-ष्टांत दिवस काढणें त्याला भाग पाडलें. ह्या त्याच्या गरिबीबद्दल त्याची पत्नी केव्हां केव्हां गाऱ्हाणें करतांना दिसून येते.लेखणीची सवत जी जीभ तिच्यावर मात्र लक्ष्मीनें आपला पूर्ण वरदहस्त ठेऊन दिला आहे.अशा रीतीनें ती लेखणीवरचा आणि लेखका-वरचा आपला सूड पूर्ण उगवून घेते. परंतु गरीब लेखणी मात्र उपकाराची फेड म्हणून आपल्या पतीशीं पूर्ण तादात्म्य पावून लेखरूपी गोडस बालकांना जन्म देते आणि अशा रीतीनें ती त्याचा वंश वृद्धिंगत करते. आपला देह झिजवूनहि ती लेख-काला अजरामर करून ठेवते. लेखकानें आपल्या ऐपतीप्रमाणें दिलेली काळीकुट्ट शाई पिऊन ती अमृताहूनहि गोड अशीं अक्षरें ओकते. अखिल विश्वाचा संहार करण्याचें अद्‌भुत

सामर्थ्य असलेलें हालाहल पिऊन टाकणाऱ्या श्री नीलकंठाची कृतीहि तिच्यापुढें फिक्की पडते. लांब देठाच्या कमलावर विराजमान झालेली चंचल लक्ष्मी कमलाला जरासा धक्का लागतांच पाण्यांत केव्हां गडप होईल, ह्याचा नेम नाहीं; परंतु लेखणीनें चंद्रमौली खोपटांत राहणाऱ्या लेखकाला मिळवून दिलेली कीर्ति मात्र अखंड राहील!

# टोपी : : १०

मनुष्याच्या चेहेरेपट्टीवरून किंवा त्याच्या डोळ्यांवरून त्याचा स्वभाव ओळखतां येतो, हें सर्वांना ठाऊक आहे. त्याचप्रमाणें माणसाच्या पोषाखावरूनहि त्याचा देश, हुद्दा धंदा वगैरे जाणतां येतो. ह्याच शास्त्राचा जर अधिक सूक्ष्म दृष्टीनें अभ्यास केला तर त्यांत ‘ टोपी ’लाहि बराच वाव मिळण्यासारखा आहे, व ‘ टोपी ’ हें एक स्वतंत्र प्रकरण ह्या शास्त्रावरील पुस्तकांत देतां येईल.

टोपीवरून स्वभावाची पारख करावयाची असल्यास निरनिराळीं माणसें कोठल्या टोप्या घालतात व त्या माणसांचें स्वभाववैशिष्ट्य काय, ह्याचा अभ्यास करावा लागेल. ह्यासाठीं दोनचार उदाहरणें देतों.

## साहेबाची टोपी ( हॅट )

साहेबाचा सध्यां सर्वच बाबतींत अग्रपूजेचा मान आहे व अर्ध्या जगावर साहेबाचीच 'टोपी' आहे तेव्हां त्या टोपीचाच पाहिल्यानें विचार करणें योग्य.

साहेबाचें सगळेंच वडें. ह्या वडेपणाचें प्रतिबिंब त्याच्या टोपींतहि पडलें आहे. गिरगांवांतल्या चार कुटुंबांची राहाण्याची जागा एका साहेबाच्या पासंगाला देखील पुरणार नाहीं. त्याचप्रमाणें त्याचा पगार. हा त्याचा वडेपणा त्याच्या टोपींतहि आहे. ती देखील चांगलीच ऐसपैस जागा व्यापते, व पुष्कळदां ट्रॅममध्यें किंवा आगगाडीमध्यें ती, आपणासाठीं एका माणसाची जागा अडवून गरिबास ताटकळत देखील उभी करते. हें झालें खुद्द साहेबाशीं साम्य.

साहेबानंतर साहजिकच मेमसाहेबांचा नंबर लागतो. वास्तविक पाहातां स्त्रीदाक्षिण्याच्या दृष्टीनें मेमसाहेब पहिल्यानेंच यावयास पाहिजे होत्या. पण आम्हां लोकांत अजून स्त्रीदाक्षिण्याचा प्रसार व्हावा तितका झालेला नाहीं, आणि त्याला बिचारा लेखक तरी कसा अपवाद असूं शकणार? साहेबांत स्त्रीदाक्षिण्याचा फैलाव तर फारच झालेला आहे. स्त्रियांना सर्वच गोष्टींत पहिला मान असावा ह्या तत्त्वाचा त्यांनीं कडेलोट केला आहे. इतका कीं, कित्येक साहेबांनीं आपल्या धर्मपत्नींना आपल्या आधींच ह्या भूतलावर अवतरण्याचाहि मान दिलेला आहे. ह्याहून अधिक तत्त्वनिष्ठा ह्या स्त्रीदाक्षिण्याच्या बाबतींत काय दाखवितां येणार? असलीं उदाहरणें पाहून आम्हीं खरोखरच लाजेनें माना खालीं घातल्या पाहिजेत. असो.

साहेबाच्या काय किंवा आम्हां हिंदी लोकांच्या काय, बायका डोक्यावर बसणारच व हेंच तत्व साहेबाची टोपी व आमची टोपी राजरोस जगापुढें मांडीत आहेत; पण साहेब गाडींत बसल्यावर किंवा कोठेंहि सार्वजनिक ठिकाणीं आपली टोपी आपल्या शेजारींच ठेवील, किंवा भर चारचौघांत आपल्या मांडीवर घेऊन बसेल व लोकांची नजर गेली तरी त्याला त्याची दिक्कत वाटणार नाहीं. आमची गोष्ट तशी नाहीं. आम्ही टोपीची घडी करून तिला खिशांत लपवून ठेऊन देऊं किंवा फार तर तिला मुठींत ठेवूं. साहेबाच्या टोपीसारखे अजून तरी तिला आम्ही चाळे करूं देत नाहीं, हें आमच्या आर्य-संस्कृतीला भूषणावहच आहे.

साहेबानें टोपी घातली कीं तिची सावली त्याच्या तोंडावर पडते, आणि साहेबाच्या तोंडावरील विकार स्पष्ट दिसणें मुष्किलीचें होतें. ह्यावरून साहेबाच्या पाताळयंत्रीपणास त्याची टोपी कशी मदत करते किंवा त्याची टोपी हें त्याच्या ह्या गुणाचें कसें द्योतक होऊन राहिली आहे, हेंहि सहजच समजून येतें. पाव शतकाच्या मागें हिंदुस्थानांत साहेबाच्या टोपीचा प्रसार फार जोरानें होऊं लागला होता. साहेबाच्या टोपीची छाया लोकांस सुखकर वाटूं लागली होती, व हें मायबाप सरकारची सुनियंत्रित राज्यव्यवस्था लोकांना पसंत पडली होती ह्याचेंच निदर्शक होतें. आतां साहेबी सत्तेविरुद्ध चळवळ चालू झाल्याबरोबर साहेबी टोपीचेंहि उच्चाटन झालें आहे, हें सर्वत्र वापरण्यांत येत असलेल्या गांधीटोपीवरून दिसून येत आहे.

साहेबाच्या टोपीनें सावली देण्याची आशा दाखवून आमचा पैसा नेला आणि आमचा स्वाभिमान नाहींसा करून आमच्या डोक्यावर ती ठाणें देऊन बसली.

इतर लोकांना आपले विकार कळूं नयेत म्हणून जरी साहेब आपली टोपी डोक्यावर ठेवीत असला तरी एकाद्या लेडीला पाहिल्यावर तो तिला झटकन् खालीं काढतो. तिला बघून आपल्या चेहऱ्यावर खेळूं लागलेले भाव तिला नीट दिसावेत अशी तर त्याची इच्छा नसते ना ?

## महाराष्ट्रीयांची टोपी

' महाराष्ट्रीयांची टोपी ' असें लिहिण्यापेक्षां ' महाराष्ट्रीयांचें शिरस्त्राण ' असें लिहिणें अधिक सयुक्तिक झालें असतें. कारण ह्या सदराखालीं पगडी, पागोटें ह्यांचाहि विचार करावयाचा आहे. परंतु ज्याप्रमाणें अवजड पागोट्यास सध्यां रजा मिळून सुटसुटीत टोपी आमच्या डोक्यावर आलेली आहे, त्याचप्रमाणें ' शिरस्त्राण ' हें बोजड नांव आपल्या माथ्यावर धारण करण्यापेक्षां ' टोपी ' हें हलकें नांव धारण करावेसें ह्या लेखालाहि वाटलें असल्यास नकळे !

पारतंत्र्यामुळें आमची शक्ति दिवसेंदिवस कमी होऊं लागली. आमच्या वाडवडिलांच्या शक्तीपुढें आमच्या शक्तीची आम्हांला लाज वाटावी अशी स्थिति आलेली आहे. अर्थातच आमच्या या दौर्बल्यामुळें पागोटें—भलेंमोठें चक्रीपागोटें—डोक्यावर ठेवणें आम्हांला त्रासाचें व अवजड वाटूं लागलें व आम्हीं टोपीची निवड केली. ह्यामुळेंच ब्रिटिश मुत्सद्दी ' तुम्ही

शिरावर कोणतीहि जबाबदारी घेण्यास नालायक आहांत ' असें आपणां हिन्दी लोकांस सांगत असतात, कीं काय, न कळे !

पगडीचे अनेक उपयोग असत. त्यामुळें माणसास भारदस्तपणा येत असे. पगडीचें वजन डोक्यावर ठेवून त्याच्या दाबाखालीं संस्कृताचें अगाध ज्ञान भरून ठेविलें आहे, असा अजूनहि साहजिकच ग्रह होतो. शिवाय पगडीचा मोठा उपयोग म्हणजे पगडी परिस्थितीप्रमाणें वाटेल तशी फिरवितां येते, आणि तिचा हाच मोठा उपयोग लक्षांत घेऊन कित्येक देशभक्तांनींहि तिला अजून आपल्या डोक्यावर धारण केलेली आहे. देशभक्तांत वकीलांचें प्रमाण अधिक कां आहे, याचा उलगडाहि ह्या पगडीवरून होण्यासारखा आहे.

येवढ्या मोठ्या पगडीचें किंवा चक्रीपागोट्याचें वजन सहन करावयास सरावल्यामुळें पूर्वीच्या लोकांस बायका डोईजड झाल्या नाहींत. एखादे वेळीं ती डोईजड वाटूं लागलीच तर लगेच तिला खुंटीवर टांगीत. पण अलिकडच्या लोकांना टोपीची संवय असल्यामुळें त्यांना बायका फारच डोईजड वाटूं लागल्या आहेत, व ते त्यांच्यापुढें फारच नमून वागूं लागले आहेत. त्यामुळें आर्यसंस्कृतीस बराच जबर धक्का बसला आहे, ह्यांत शंका नाहीं. म्हणूनच आमच्या पूर्वजांनीं लोक साहेबी पोषाख करूं लागल्यावर मोठी ओरड केली होती. धन्य त्या आमच्या दूरदृष्टि पूर्वजांची !

फेटा, कोशा वगैरे बांधलेला मनुष्य रंगेल किंवा उथळ्या असावयाचा, त्याचप्रमाणें बसका रुमाल बांधणारा इसम बहुधा

कंजुष आणि स्वार्थी असणार, हा जवळजवळ ठरल्यासारखाच नियम आहे. फेटा बांधण्यांत बराच वेळ जातो, तो तरी फुकट कां दवडा म्हणून आंखूड व कमी कापडाच्या रुमालाची युक्ति शोधून काढण्यांत आली असावी. रुमाल बांधणारे कंजुष असले तरी न्यायी असतात. त्यांच्या रुमालाची लांबी बरीच आंखूड केलेली असली, तरी डोक्याच्या उजव्या आणि डाव्या बाजूला सारखाच रुमालाचा भाग मिळावा म्हणून रुमाल बांधतांना त्याच्या मध्यभागावरून सुरवात करण्यांत येते, व दोन्हीं बाजूंस समसमान भाग देण्यांत येतो. रुमालामुळें सौंदर्यास उठाव मिळत नाहीं. ह्यावरून रुमाल बांधणारा व्यवहारी अगर वेदांती असावा, असा ठाम निश्चय बांधतां येतो.

हल्लींच्या धांवपळीच्या युगांत कादंबरीची जागा लघुकथेनें पटकावलेली आहे, त्याचप्रमाणें पगडीची जागा टोपीनें घेतलेली आहे. टोपीहि न घालण्याची रीत प्रचारांत आहे. हे बहुतेक कॉलेजांतले ब्रह्मचारी—नव्हे अविवाहित—तरुण असतात. टोपी ज्याप्रमाणें राजकीय मत दर्शवितें त्याचप्रमाणें हे बिनटोपीचे लोक बिनमताचे असतात; परंतु ते तसें कधींहि कबूल करावयाचे नाहींत. त्यांचीं 'मतें' मोठीं (त्यांच्या मतें) असतात व त्यांच्या बोडकेपणाचा अर्थ 'अराजकता' असा करावयाचा असतो. असो. राजकीय मतांत, समाजस्थितींत व आजूबाजूच्या परिस्थितींत जसजसा फरक होत गेला तसतसें त्याचें प्रतिबिंब आमच्या टोपींतहि

पडून गेलें. हंगेरीयन कॅप्स् गेल्या, नंतर सुटसुटीत घडीच्या टोप्या आल्या. त्यानंतर तेहि दिवस जाऊन आमच्या मनांत राष्ट्रीय भावनेचा लख्ख प्रकाश पडला व आमच्या टोपीचा काळेपणा नाहींसा होऊन, धोब्याकडे जाऊन आलेली पांढरी स्वच्छ गांधीटोपी आमच्या डोक्यावर नांदूं लागली.

## गांधी–टोपी

महात्माजींच्या मतांचा प्रभाव आमच्या मनांवर पडतांच, डोक्यावर गांधी-टोपी हें त्याचें निदर्शक म्हणून आली. गांधी-टोपी घातलेला मनुष्य दुसऱ्या असंख्य गांधी-टोपीवाल्यांना आपल्या बंधुसमान मानतो असा समज होतो, व ह्या एक-राष्ट्रीयत्वाच्या भावनेचा ह्या टोपीमुळें चांगलाच पुरस्कार झालेला आहे.

स्वतःच्या सुताची गांधी-टोपी व फेरीवाल्यांकडून घेत लेली गांधी-टोपी ह्यांत जमीन अस्मानाचें अंतर आहे. स्वश्रमानें घातलेली टोपी ओबडधोबड असली तरी ती प्यार असते, व स्वतःच्या निष्ठेमुळें ती घातलेली असते. असा मनुष्य तत्वनिष्ठ समजावा. बाजारी टोपी वापरणारे केवळ लोकमतासाठीं वापरणारे समजावेत. लोकमत लवकरच बदलतें, आणि तोंपर्यंत ती टोपीहि मळून जाते; तेव्हां तिची हाकलपट्टी झालीच म्हणून समजावें. स्वतः सूत काढणारे मरेपर्यंत खादीच वापरतील.

असो; टोपींतहि उंच टोपी, बसकी टोपी, गोल टोपी, घडीची टोपी असे शेकडों प्रकार असतात. त्यावरून वाचकांनीं आपापलीं मतें बनवावींत. परंतु त्यांनीं तीं जरा सावध-

गिरीनेंच बनवावींत. कारण टोपी घालूं नये, असें वाटत असलेला एखादा गृहस्थ केवळ टक्कल लपविण्यासाठींच टोपी वापरीत असेल, व अशा रीतीनें तो वाचकास बेमालुम फसवील. तेलकट टोपींत तैलबुद्धि असेल असें अनुमान करणें वरवर आणि धाष्टर्याचें होईल. तिरंगी टोपी घालणारे सरड्यासारखे रंग पालटणारे असतात, हें अनुमान मात्र चुकीचें होणार नाहीं. त्याचप्रमाणें गोंडयाची टोपी मुसलमानांचा रंगेलपणा दाखविते, तशीच बोहऱ्याची लहानशी टोपी त्याच्या लहानशा दुकानाची व दाढीची आठवण करून देईल.

## वहाणा ! : : ११

सूर्य आणि पृथ्वी, दिवस आणि रात्र, पोपट आणि मैना, नंदी आणि गाय, कवि आणि कविता, इत्यादि परमेश्वरानें ज्याप्रमाणें बऱ्यावाईट जोडया निर्माण केल्या आहेत, त्याच-प्रमाणें त्यानें वहाणांचीहि एक जोडी निर्माण करून ठेवली आहे. ही जोडी कधीं निर्माण झाली, हें जरी नक्की सांगतां येण्यासारखें नसलें, तरी सूर्यानेंच उन्हापासून त्रास होऊं नये म्हणून अगस्ति मुनीला छत्री आणि वहाणा दिल्या होत्या, अशी जी एक दंतकथा आहे, त्यावरून वहाणा ह्या फार पुरातन कालापासून प्रचलित आहेत, असें मानावयास कांहींच हरकत नाहीं. वर ज्या जोडयांचा उल्लेख केला आहे, त्यां-पासून ही वहाणांची जोडी मात्र अलग काढून ठेवावी लागेल. स्त्री-पुरुषत्वाच्या लैंगिक आकर्षणामुळें वरील जोडयांवर वैष-यिक प्रेमाचा आरोप करतां येईल. परंतु स्त्रीजातीच्या ह्या वहाणांच्या बाबतींत मात्र खरें, निष्काम आणि

अवैषयिक प्रेमच दिसून येतें. सवतीसवती इतक्या गुण्यागोविंदानें राहिलेल्या, इतिहासाचीं हजारों पानें चाळून पाहिलें तरी, सांपडणें मुष्कील ! एका वहाणेचें दुसऱ्या वहाणेवर असलेलें प्रेम वर्णन करावयास सर्व भाषांचे शब्दकोश अपुरे पडतील. एक वहाण हरवली, तर दुसरीला अन्नपाणी गोड लागत नाहीं. ती आपल्या घरधन्याबरोबर फिरावयास जाणें, वगैरे सर्व कार्यक्रम बंद करते. अनेक संकटांतून आणि सुखमय प्रसंगांतून ती त्याच्याबरोबर फिरलेली असते, पण तीच वहाण आतां एखाद्या कोपऱ्यांत धूळ खात अज्ञातवासांत दिवस काढते. किंवा नवीन सवतींची जोडी आल्यास कोल्ह्याकुत्र्याकरवीं जिवंतपणींच मोठ्या शोचनीय रीतीनें मृत्यु पावते. तेंच जर आपल्या सवतीचा शोध लागला तर ती मोठ्या आनंदानें परत ह्या संसारांत भाग घेऊं लागते.

दिवस आणि रात्र, हीं देखील त्या महान् कालपुरुषाच्या पायांतील पादत्राणेंच असावींत. ह्या विशाल वहाणा घालून तो आपला अबाढव्य प्रवास आक्रमीत आहे. त्याच्या एकएका पावलाबरोबर दिवस आणि रात्र क्रमाक्रमानें पुढेंपुढें येतात आणि दुसऱ्याला मागें टाकतात. ह्या दोन वहाणांत एकमेकींच्या पुढें जाण्याची अहमहमिका चालू आहे. परंतु ही अहमहमिका निर्मत्सर आहे, आणि म्हणूनच कालपुरुषाचीं पावलें पुढेंपुढेंच पडत आहेत. वहाणेचें आपल्या सवतीवर असलेल्या स्वच्छ प्रेमाचें हें उत्तम उदाहरण होय.

ज्याच्याशीं ह्या वहाणेचें लग्न लागलें, त्याच्या चरणीं ती एखाद्या आर्य पतिव्रतेप्रमाणें आपलें सर्वस्व अर्पण करते. आपल्या शरीराची ढाल करून, आपल्या पतीच्या चरण-कमलांचा ती कांट्यांकुट्यांपासून बचाव करते. पतीच्या सुखासाठीं स्वतःचा देह झिजवावा लागला तरी ती त्याची पर्वा करीत नाहीं. परंतु त्याच पतिव्रता वहाणेचें तारुण्य संपलें, म्हणजे हा निर्दय पुरुष तिला लाथाडून द्यावयास कमी करीत नाहीं !

" स्त्रीला पायांतल्या वहाणेप्रमाणें वागवावें, " असा दण्डक आमच्या पूर्वजांनीं घालून दिलेला आहे. त्यावरून स्त्रिया आणि वहाणा ह्यांतील साम्य त्यांनीं ओळखलें असावें असें दिसून येतें. आपल्या पतीबरोबर सर्व सुखदुःखांतून आयुष्याचा प्रवास करणाऱ्या स्त्रीप्रमाणें वहाणाहि आपल्या मालकाला क्वचितच विसंबतात. स्त्रीधर्मानुसार त्याहि आपल्या मालकाबरोबर आपणाला सर्व ठिकाणीं मिरवून घेतात. बरें, फिरतांना त्या स्वस्थपणें बरोबर येतील तर तेंहि नाहीं. बडबड त्यांच्या पांचवीला पुजलेली आहे. सदासर्वकाळ त्यांची कुरकुर चाल-लेलीच असते. लाल शाली पांघरून निघालेल्या पुणेरी वहाणा ( जोडे ) तर रस्त्यानें फाड् फाड् फुटाणेच फोडीत चालतात ! लग्न करणें म्हणजे आंतल्या खिशाला एक मोठें भोंक पाडण्या-सारखेंच आहे. त्याचप्रमाणें वहाणा विकत घेणें हीहि एक मोठी आपत्तिच स्वतःवर ओढवून घेणें होय ! " मला अमु-कच पाहिजे, तमुकच मला द्या " ह्याप्रमाणें पत्नी आपल्या

पतीमागें सारखी टुमणें लावते आणि त्याला कर्जबाजारी बनवून सोडते, तशीच स्थिति वहाणांच्याहि बाबतींत प्राप्त होते. तिला घेतल्याबरोबर सचैल स्नान घालण्यापासून जी खर्चाला सुरवात होते, ती दर आठवड्या-दोन आठवड्याला पैसा, आणा ह्याप्रमाणें चालूच राहते. त्यामुळें जीव तर अगदीं वैतागून जातो. आणि ही खर्चाची कटकट आणि त्याचबरोबर तिन्हीत्रिकाळ चालणारी वटवट चुकविण्यासाठीं "अनवाणी" चालणेंच पुरवलें, असेंहि कित्येकदा वाटूं लागतें.

बायको घरीं आणल्यावर जितक्या सावधगिरीनें रहावें लागतें तितकीच सावधगिरी एकदां वहाणा विकत घेतली म्हणजे ठेवावी लागते. पावसाळ्यांत रस्त्यानें चालतांना वहाणेला जराशी सैल सोडली, तर आपल्या अंगावर चिखलाचे शिंतोडे उडालेच म्हणून समजावें. त्याचप्रमाणें संभाळून चाललें नाहीं, तर ती आपल्याला सफै तोंडघशीं पाडून भररस्त्यांत आपली बेअब्रु केल्याशिवाय मुळींच राहणार नाहीं. हिला बरोबर घेऊन खालीं मान घालून रस्त्यानें अगदीं सभ्यतेनें चाललें, तरी देखील ती चांभारचौकशा करणाऱ्यांच्या बोलण्याचा विषय हटकून व्हायचीच.

संसारांतल्या सोबत्याच्या सान्निध्यामुळें देवाची आठवण जितकी ताजी राहते, तितकीच ह्या वहाणांमुळेंहि राहते. कीर्तन-पुराणास गेलेल्या लोकांत दोन प्रकारचे लोक असतात. फत्कलें मारून बसलेल्या स्त्रीसमुदायाकडे दृष्टि लावून बसलेला एक वर्ग, आणि दाराशीं असलेल्या वहाणांच्या समुदायावर

आपली पापी नजर लावून बसलेल्यांचा दुसरा वर्ग. कीर्तनाच्या दिवशीं जर एखादी सुंदर वहाण पळविली गेली नाहीं, तर तें खरें कीर्तनच नव्हे, असें मी समजतों. माझ्या आजोबांना ह्याचा बराच अनुभव आला होता. कीर्तनास न चुकतां जाऊन तें ऐन रंगांत आलें असतां पेंगण्याची त्यांना संवय होती. आणि त्या वेळीं त्यांच्या वहाणा हटकून चोरीस जात. दर कीर्तनाला त्यांच्या वहाणा चोरीस जात असल्यामुळें, त्यांच्या वहाणा नेहमींच नव्या असत. परंतु त्यांच्या वरच्या शरीराच्या रुबाबास त्या तरण्याबांड वहाणा शोभत नव्हत्या. म्हणून जरठकुमारी विवाहाचा निषेध म्हणून त्यांच्या वहाणा कोणी सौंदर्यभोक्ता पळवून नेत असे. त्यानंतर रात्रीच्या अंधारांतून अनवाणी घरीं येतांना बिचाऱ्या माझ्या आजोबांचे हालहाल होत. अंगठ्याला घडीघडी ठेंचा लागून त्यांतून भळभळा रक्त वाहूं लागे, आणि त्या वेळीं देवाच्या नांवाचा उच्चार करून कीर्तनाच्या वेळीं डुलक्या घेण्यांत घालविलेल्या वेळाची ते भरपाई करीत. "पुढच्यास ठेंच मागचा शाहणा" ह्या म्हणीप्रमाणें आजोबांना लागलेल्या अनेक ठेंचांमुळें हा नातू शहाणा झालेला आहे. कीर्तनास जातांना मी बायको आणि वहाणा बरोबर नेत नाहीं.

खेडयापाडयांतून राहणाऱ्या वहाणांचें आरोग्य आणि धडधाकटपणा कोणीकडे, आणि शहरांत राहणाऱ्या ह्या नाजूक चपलाताई कोणीकडे ! खेडवळ वहाणा शेतावर बागडतात, डोंगरावर खांचाखळग्यांतून आणि रानावनांत कांटयांकुटयांतून

बेदरकार फिरतात. तेथल्या मोकळ्या आणि शुद्ध हवेंत स्वच्छंद फिरल्यानें त्या धडधाकट राहिल्या आहेत. शेणामातींत फिरण्यास देखील त्यांना कांहींच वाटत नाहीं. आरशाच्या टिकल्या आणि लोंकरीचे गोंडे ह्यासारखे साधे आणि खेडवळ अलंकारसुद्धा त्यांना शोभून दिसतात. त्याच ह्या शहरांतील चपलाबाई पहा ! शहरांतल्या कृत्रिम वस्तींत राहून त्याहि कृत्रिम बनल्या आहेत. स्वच्छतेच्या नांवाखालीं त्या बहुधा गालिच्याखालीं उतरत नाहींत. त्यांना येथून तेथें जावयाचें श्रम देखील सहन होत नाहींत. ताटावरून पाटावर आणि पाटावरून ताटावर करावयाचें झाल्यास देखील त्यांना मोटारीची नाहीं तर गाडीची जरूर लागते. त्यांच्या फॅशनबद्दल तर विचारूंच नका ! मखमालीचे पट्टे काय लावतात, जरीच्या वेलबुट्ट्या लावून काय मिरवतात ! लावण्या आणि भावगीतें ह्यांच्याइतका वहाणा आणि चपला ह्यांत फरक आहे. वहाणा जितक्या अल्लड आणि कणखर आहेत, तितक्याच चपला कृत्रिम आणि नाजूक आहेत. हवामानांत जरासा फरक झाला, कीं बॅरॉमिटरपेक्षांहि लवकर त्यांच्यांत फरक पडतो. जरा कोठें पाऊस पडला, कीं ह्या कोमलांगी चपलाबाई आजारी पडल्याच म्हणून समजावें. मग त्यांच्या डॉक्टरांचीं बिलें भरतां भरतां खऱ्या चालत्याबोलत्या बायकोच्या आजारपणाचीं बिलें त्यापुढें पुरवलीं, असें होऊन जातें.

इंग्रजांच्या वहाणा म्हणजे त्यांचे बूट ! त्या तर काय इतक्या फॅशन करतात, कीं तें वर्णन करण्याचा प्रयत्नच न

करणें बरें! घराबाहेर जातांना किंवा कित्येकदां रस्त्यांत थांबूनसुद्धां ब्रशनें बराच वेळ नट्टीपट्टी करतांना आणि सबंध अंगावर पावडर मारतांना त्या पावलोपावलीं दिसून येतात. त्यांचें उदाहरण डोळ्यांपुढें ठेऊन आमच्याकडील कांहीं चपलाबाईनीहि तोंडावर पावडर मारण्याची फॅशन उचललेली दिसते. साहेब आणि त्याची बायको जी मडम हीं कामाखेरीज एकमेकांकडे फारसें बोलतांना विशेषसें दिसून येत नाहीं. त्यामुळें त्यांच्यामध्यें बराच आडपडदा असतो, हें साहेबाचें पाय आणि बूट ह्यांमध्यें असलेल्या मोज्यांवरून सहजच दिसून येतें. बऱ्याच वर्षांपूर्वीपासून साहेबांनीं आपल्या मडमांना टोपीची जागा देऊन डोक्यावर घेऊन नाचावयास सुरवात केलेली असल्यामुळें, साहाजिकच ह्या अनेक वर्षांच्या कालांत बूट आणि मडम ह्यांच्यातलें साम्य कमी कमी होत गेल्यास नवल तें काय? तरी पण साहेबांचे पूर्वजहि मडमांना पादत्राणांच्याच योग्यतेचें समजत, असें एकंदरींत दिसून येतें. स्त्रीचें सर्वांत प्रभावशाली शस्त्र जी जीभ, ती त्यांनीं बुटाला लावून हें साम्य दाखविण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. पण साहेब एकंदरीत डोक्याचे खरे! ह्या जीभेपासून आपल्या कामांत व्यत्यय येऊं नये म्हणून त्यांनीं ती बंदांनीं पक्की बांधून टाकली आहे.

स्त्रीदाक्षिण्याच्या फैलावाबरोबर चपलांनाहि डोक्यावर बसवावें अशी चळवळ चालू झाली आहे, हें सुचिन्ह होय! अशी डोक्यावर बसणारी चप्पल पाहण्याचें प्रस्तुत

लेखकाचें भाग्य अजून तरी उदयास आलेलें नाहीं. तरी डोक्याच्या अगदीं जवळच्या प्रदेशापर्यंत तिनें स्वारी केलेली त्यानें अनेकदां पाहिलेली आहे. आधीं मोठा कडकडाड होतो, आणि विजेच्या वेगानें चपला आणि गाल ह्यांची कड-कडून भेट होते. लगेच डोळ्यांसमोर विजा कडाडल्याचा भास होतो. "बिनबादल बिजली" चमकते ती अशी ! असो. लवकरच चपला डोक्यावर बसून टोपीचें तेथून उच्चाटन करतील अशी सदिच्छा प्रदर्शित करून हा लेख येथेंच संपवितों.

## इश्श ! : : १२

फार पुरातन कालीं देवांनीं आणि दैत्यांनीं मिळून क्षीर-सागराचें मंथन केलें, आणि त्यांतून चौदा रत्नें शोधून काढलीं. मराठी भाषेच्या शब्दरत्नाकराचेंहि जर कोणी मंथन केलें, तर त्यांतूनहि एकच, पण अत्यंत प्रभावशाली रत्न बाहेर पडेल. आणि तें म्हणजे " इश्श " हा शब्द होय.

क्षीरसागरांतून निघालेल्या ठळक ठळक रत्नांचे सर्व गुण त्याच्यांत आहेत. त्यांत अमृताचें माधुर्य आहे, नवनीताची कोमलता आहे, तशीच हालाहलाची आणि चौदाव्या रत्नाची कठोरताहि आहे.

भगवान् श्रीकृष्णांनीं चारहि वेदांचें सार म्हणून भगवद्गीता रचिली. त्याचप्रमाणें मराठी भाषेच्या सौंदर्याचें सार म्हणून, 'इश्श' ह्या शब्दाकडे बोट दाखविण्यास हरकत नाहीं. भगवद्गीतेचा कर्ता म्हणून भगवान् श्रीकृष्णाचें नांव प्रसिद्ध आहे. परंतु भगवद्गीतेपेक्षांहि मोठे जे वेद त्यांचा जनक कोण

आहे, ह्याचा मात्र मुळींच पत्ता नाहीं. ते साक्षात् परमेश्वराच्याच श्वासापासून निर्माण झाले आहेत, अशी सर्वांची श्रद्धा आहे. म्हणूनच त्यांना ‘ अपौरुषेय ’ असें म्हणतात. ‘ इश्श ’ शब्दाचें जनकत्व कोणाकडे आहे, हें शोधून काढतांना व्युत्पत्तिशास्त्रज्ञांच्या नाकीं नऊ येतील. इतिहासपूर्व कालापासून तो शब्द चालत आलेला आहे. तोहि खात्रीनें ‘ अपौरुषेयच ’ असला पाहिजे. साक्षात् ईशानें त्याला निर्माण केलें, म्हणूनच त्याचें नांव ‘ इश्श ’ असें पडलें असावें !

नाहीं तर सामान्य मानवानें निर्माण केलेल्या शब्दांत इतका खोल आणि व्यापक अर्थ कोठला असावयाला ! अनंत अर्थ आपल्या लहानग्या पोटांत सामावणारा हा शब्द खुद्द ईश्वरानेंच निर्माण केला असला पाहिजे ! ईश्वर ज्याप्रमाणें स्वतः निराकार आणि निर्विकार आहे, त्याचप्रमाणें त्याचा हा प्रभावशाली मानसपुत्रहि निर्विकार आणि निराकार आहे. परमेश्वराच्या अनेक भक्तांना त्याचीं स्वरूपें अनेक दिसतात. त्याचप्रमाणें त्याचे विकारहि निरानिराळे दिसतात. प्रत्येकाला परमेश्वराचें स्वरूप आपआपल्या मनाच्या धाटणीप्रमाणें दिसून येतें. एकच परमेश्वर मासा, कासव, माकड, निरनिराळीं झाडें, किंवा नुसते शेंदूर फासलेले दगड ह्यांमधून देखील ज्याप्रमाणें त्याच्या भक्तांना दिसून येतो, त्याचप्रमाणें, राम किंवा कृष्ण ह्यांच्यासारख्या मनमोहन स्वरूपांतहि दिसून येतो. परमेश्वराप्रमाणेंच ‘ इश्श ’ हा शब्दहि त्याचा उच्चार करणाऱ्याच्या मनःस्थितीप्रमाणें निरनिराळें स्वरूप धारण करतो.

परमेश्वरानें नऊ अवतार धारण केले. प्रत्येक युगाला एक ह्या-प्रमाणें तो अवतार धारण करतो, तर त्याचा हा बापसे सवाई बेटा दिवसांतून अनेक अवतार धारण करतो ! दिवसांतून जरी तो अनेक अवतार धारण करीत असला, तरी आठवा अवतारच तो पुष्कळ वेळां घेतो. तरुण-तरुणींच्या एकांत-वासांत तरुणीवर गोंधळून जाण्याचे पुष्कळ प्रसंग येतात. त्या वेळीं काय करावें, काय बोलावें हें तिला समजेनासें होऊन जातें. अशा वेळीं हा इश्श शब्द आपला आठवा अवतार धारण करून तिची सुटका करण्यासाठीं धांवून जातो. त्या वेळीं द्रौपदीच्या लज्जारक्षणार्थ धांवत गेलेल्या श्रीकृष्णाची आठवण झाल्यावांचून राहत नाहीं. दिवसांतून शेकडों वेळां आपल्या नामाचा जप करणाऱ्या एकनिष्ठ भक्तीणीप्रित्यर्थ, तो आपलीं इतर सर्व कामें बाजूला टाकून धांवत येतो आणि त्या घोर पण गोड संकटांतून तिची सुटका करतो.

" इश्श ! " उत्तर तर आहे आणि नाहींहि ! पण उत्तर नसलें तरी अनेक वाक्यांच्या उत्तरानेंहि होणार नाहीं इतकें काम त्यानें फत्ते होतें ! 'हो' आणि 'नाहीं' हीं दोन परस्परविरुद्ध स्वभावाचीं जुळीं भावंडें त्याच्या पोटांत आहेत. 'अस्ति' आणि 'नास्ति' ह्या दोघांचा सुंदर मिलाफ त्याच्यामध्यें झालेला आहे. भागीरथीचें शुभ्र पाणी आणि यमुनेचें काळें पाणी ह्यांच्या संगमाइतकाच 'इश्श' आल्हाद-दायक आहे !

'इश्श'चा बहुतेक उपयोग ह्याच अर्थानें होतो. परंतु तो

इतरहि अनेक रूपें धारण करतो. एखादा कसलेला नट आपल्या पोपाखांत आणि चेहऱ्यावर योग्य तो फेरबदल केल्यावर जसा निराळा भासतो, तसा हा इश्श शब्द निरनिराळ्या भूमिका धारण करून जगाच्या रंगभूमीवर वावरतो.

" इश्श ! सिगारेट सोडून द्यावी बाई आपण ! "–तिरस्कार.

" इश्श ग बाई ! काय मेल्याची दुर्दशा ही ! "–करूणा.

" इश्शऽअ ! कोणी बघतील ! "–भीति.

" इश्श ! कार्ट्यांनीं म्हणजे घर अगदीं डोक्यावर घेतलंय ! "--वैताग.

सूक्ष्म रीतीनें रोजचा व्यवहार, विशेषतः माजघर आणि स्वयंपाक खोली पाहणाऱ्या संसारी माणसाला ' इश्श 'चे असे आणखी कितीतरी अवतार पहावयास मिळतील.

केस लांब वाढविणें, त्यांत फुलें माळून घेणें, कुंकुमतिलकानें आपला भालप्रदेश शोभायमान करून घेणें, इत्यादि जे विशेष अधिकार आमच्याकडील स्त्रियांना आमच्या पूर्वजांनीं अदूरदर्शीपणानें देऊन ठेवले आहेत, त्याचप्रमाणें ' इश्श ' आणि 'मेल्या' ह्या दोन शब्दांचा उपयोग करण्याचा सरसहा हक्क पण त्यांना दिलेला आहे. पुरुषांना हे शब्द उपयोगांत आणतां येत नाहींत. आपणास एखादा विशेष अधिकार मिळाला, म्हणजे नवी कुऱ्हाड मिळाल्यावर लहानग्या वॉशिंग्टनची स्थिति झाली, तशी स्थिति कोणाचीहि होते, आणि त्या अधिकाराचा उपयोग ठायींअनाठायीं कर-

वासा त्याला वाटूं लागतो. त्यामुळें आमच्याकडील स्त्रिया ह्या 'इश्श'चा वाटेल तेव्हां आणि वाटेल तेथें सर्रास उपयोग करूं लागल्या आहेत. जणूं काय आपल्याला मिळालेल्या ह्या विशेष अधिकाराची जाणीव दुसऱ्यांना करून देण्याचा त्यांचा हेतु असतो. ह्या सुंदर शब्दाची थोरवी पूर्णपणें जाणून प्रत्येक वाक्यांत स्त्रिया त्याला अग्रपूजेचा मान देतात. नाटकाच्या आधीं ईशस्तवन, तसें प्रत्येक वाक्याच्या आधीं हें इश्शस्तवन ठरलेलेंच आहे! ह्या शब्दाला, थोड्याच वेळांत कानांवर येऊन आदळणाऱ्या मालगाडीच्या खडखडाटाची धोक्याची सूचना म्हणूनहि समजण्यास कांहींच हरकत नाहीं. प्रत्येक वाक्यांत पहिल्या खुर्चीचा मान देऊन स्त्रीवर्गानें ह्या सुंदर शब्दाचा योग्य तोच गौरव केलेला आहे. इतक्या सुंदर आणि व्यापक शब्दाचे सर्व हक्क सर्वस्वी स्त्रीजातीला अर्पण करण्यांत आमच्या पूर्वजांनीं फारसा शहाणपणा दाखविला, असें मुळींच म्हणतां येणार नाहीं.

कालिदास, शेक्सपीयर, गटे, होमर, टागोर, ह्यांसारख्या महान् कविपुंगवांनीं आपल्या अचाट प्रतिभाशक्तीनें आपआपल्या भाषेच्या काव्यसंभारांत बहुमोल भर घातली, आणि आपल्या मायभाषांना अलंकृत करून ठेवलें. परंतु त्यापैकीं कोणालाहि, पारिजातकाइतका सुवासिक, आकाशाइतका व्यापक, अमृताइतका गोड, परमेश्वराइतका बहुरूपी, आणि संगीताहूनहि मधुर असा, 'इश्श' शब्दासारखा शब्द निर्माण करतां आला नाहीं. ह्याच लेखाचें दुसऱ्या एखाद्या

भाषेंत रूपांतर करावयाचें मनांत योजून जर एखादी लेखिका बसली, तर ती ‘ इश्श ’ शब्द येतांच त्याचा संपूर्ण अर्थ आपल्या भाषेंत आणण्यासाठीं ग्रंथांवर ग्रंथ लिहूं लागेल, आणि शेवटीं तेंहि अपुरें आणि असमाधानकारक वाटतांच, ती ‘ इश्श’ म्हणूनच आपलें लेखन थांबवील व अखेरीस तो नादच सोडून देईल.

आकाशांतील अनंत तारकागणांत चंद्राप्रमाणें, अनंत प्रकारच्या रत्नसमुच्चयांत कौस्तुभमण्याप्रमाणें, हा शब्द सर्व भाषांतील शब्दांत आपल्या अर्थवैपुल्यानें उठून दिसतो. देशोंदेशींच्या सुंदरींच्या घोळक्यांत आपल्या भालप्रदेशावरील कुंकुमतिलकामुळें उठून दिसणाऱ्या आर्य रमणीप्रमाणें, आमची मराठी भाषा इतर भाषांत ह्या शब्दामुळें शोभून दिसते !

